N.A.

Sri Bhimamahatmyam.

श्री भीमा माहात्म्य

Marathi

Paper - Printed

1886 San (132 years old)

128 Folio (Chapter 1 missing)

9.5" x 6.5"

Incomplete

श्रीगणेशायनमः॥ ॥श्रीसरस्वत्यैनमः॥ श्रीगुरुभ्योनमः॥ श्रीभीमाशंकरायन
मः ॥ॐनमोजीपुराणपुरुषा॥सकलजगदानंदविलासा ॥ मुमुक्षुजनदुःखनाशा
॥ भक्तसुखदाकल्पतरो॥१॥ ऋषिह्मणतीसूतातें ॥ भीमेचियामाहात्म्यातें॥ विधी
सांगताझालानारदातें ॥ तेंसांगावेंकृपेनें॥२॥ ऐसेंमाहात्म्यअद्भुत ॥ सर्वजगातें
व्हावेंश्रुत ॥ ऐसीआमुचीइच्छाबहुत ॥ असेजाणेंपुराणज्ञा ॥ ३ ॥ सर्वत्रप्राणि
मात्रांहीं ॥ प्रयत्नेंधुंडावीअखिलमही ॥ जेथेंश्रवणामिळेलकथाहीं ॥ सद्भावानें
श्रवणकीजे ॥ ४ ॥ ओंवीअथवाअर्धओंवी ॥ नित्यपठणकरावी ॥ वाचनाभावीं
श्रवणकरावी ॥ नेमेंकरूनसर्वदा ॥५॥ ऐसानियमजोकरी ॥ त्याचींपापेंकोटिचा
री ॥ असतीलजन्मार्जितजरी ॥ तात्काळनष्टहोतील ॥ ६ ॥ हीकथासाधुजनां
सांगावी ॥ अतिगुप्तअसेबरवी ॥ शिवाचेदेवालयींवाचावी ॥ पुण्यक्षेत्रींसभेमा
जी ॥७॥ ब्राह्मणद्वेष्टेअसतीपाहीं ॥ साधुदर्शनींप्रत्यक्षअहि ॥ कुतर्कप्रियमानि
लाज्यांहीं ॥ पापाचरणीअसतीजे ॥ ८ ॥ ऐसियाजनांतेंपाहीं ॥ भीमाचरित्र
प्राणांतींही ॥ नकथिजेकदाकाळींही ॥ ऐसेंआमुचेंमतअसे ॥ ९ ॥ कामादिजे
असतीदोष ॥ ज्यांहींकेलातन्निरास ॥ शिवभक्तिप्रीतिवसेज्यांस ॥ त्यांतेंकथा

---

१ मुक्तहोण्याचीइच्छाकरणारे. २ इच्छितफलदेणाऱ्या. ३ पुराणजाणणाऱ्या. ४ भीमाचरित्र. ५ वाचतां येतनसल्यास. ६ सर्प. ७ काम, क्रोध, मोह, लोभ,मद आणि मत्सर हे सहा रिपु ( दोष ). ८ जिंकिले.

सांगावी ॥ १० ॥ गुरुभक्तिरतजेअसती ॥ जयातेंअसेपितरप्रीती ॥ तयाहेंमोक्ष
साधननिगुती ॥ कथनकरावेंपर्यंसा ॥ ११ ॥ भीमाशंकरदेवादिदेव ॥ दुःखना
॥ १ ॥ शनस्मरतांनांव ॥ उत्तमअसेज्याचाभाव ॥ तयावरीसंतुष्टहोई ॥ १२ ॥ अवश्य ॥ २ ॥
त्वेंकरूनिजाण ॥ जोकरीशिवस्मरण ॥ अथवाकरीउच्चारण ॥ पापेंनष्टहोतीत्या
चीं ॥ १३ ॥ संसारहेंचिघोरकांतार ॥ त्यातेंदावाग्निभीमाशंकर ॥ स्मरणकरितां
पापसंहार ॥ शीघ्रहोईलजाणपां ॥ १४ ॥ एतदर्थहेंचरित्रउत्तम ॥ श्रवणकरा
वेंस्मरतनाम ॥ कृतकृत्यहोईजरिनराधम ॥ जगत्रयींवंद्यतो ॥ १५ ॥ पूर्वजन्मा
र्जितपुण्यअसे ॥ तयाचीबुद्धीपठणींवसे ॥ श्रवणकरावयाभक्तीनेंबैसे ॥ तोचिध
न्यजगामाजी ॥१६॥ जयाचीवसेश्रवणींबुद्धी ॥ तेचिजाणावेजगींसुधी ॥ तयांची
होतसेपुण्यवृद्धी ॥ जगहितकारीतेचिजन ॥१७॥ निर्द्वंतअथवाकलहकरितां ॥ दु
ष्टजनांचीकुतर्कता ॥ तन्निरासार्थभीमाचरिता ॥ श्रवणकरावेंऋषिजनहो ॥१८॥
ब्रह्मदेवेंनारदाप्रती ॥ जेंसांगीतलेंसप्रीती ॥ तीचकथायथामती ॥ तुह्मालागींनि
वेदितों ॥ १९ ॥ इंद्रादिदेवांचाबाप ॥ होताऋषिश्रेष्ठकश्यप ॥ तयाचेंअसेउग्रत ॥ १ ॥
प ॥ मंत्रद्रष्टाअसेहा ॥ २० ॥ प्राचेतसदक्षप्रजापती ॥ तयातेंकन्यासाठमिती ॥
तयांतूनितेराअतिप्रीती ॥ संतानार्थदिल्यायातें ॥ २१ ॥ त्यांमध्येंअदितीपासु

१ मोठें अरण्य. २ वणवा. ३ नीच (पापी मनुष्य). ४ चांगल्या बुद्धीचे. ५ द्वेषबुद्धिनष्ट होण्याकरितां. ६ नांव ७ अदि-

नी ॥ इंद्रादिदेवसत्वगुणी ॥ दैत्यझालेतमोगुणी ॥ दितीपासूनिजाणिजे ॥२२॥
देवदैत्यींसापत्नत्व ॥ ह्मणोनिवाढलेंशत्रुत्व ॥ युद्धकरितीक्रूरत्व ॥ जयेच्छावसे
परस्पर ॥ २३ ॥ त्यासापत्नशत्रुत्वाचायोग ॥ युद्धमांडलेंघोरप्रसंग ॥ प्राप्तचि
भासेकल्पांतमेघ ॥ भयंकरशब्दत्यापरी ॥२४॥ दैत्यकरितीबाणवृष्टी॥उपमीअसे
पर्जन्यवृष्टि ॥ गजबजिलीदेवसृष्टी ॥ युद्धकरितीक्रोधयुक्त ॥ २५ ॥ इंद्रादिदेवही
त्यासमरीं॥जावूनिदैत्यचमूभीतरीं॥ मारामाराफाडायापरी ॥ शब्दकरितीआक्रो
शें ॥ २६ ॥ ऐसेशब्ददेवकरित ॥ त्यांतचीदुंदुभिनादहोत ॥ तेणेंकरूनिकल्पां
त ॥ होईलऐसेंवाटतसे ॥ २७ ॥ देवदैत्यहोवोनिक्रुद्ध ॥ दुंदुभिसमानकरितीश
ब्द ॥ राक्षसकरितीसिंहनाद ॥ अतिआक्रोशेंपर्यंसा ॥ २८ ॥ धनुष्यांचाटणत्का
र ॥ किंकिणींचाकिणकिणस्वर ॥ तुरंगमांचेंहिंसणेंफार ॥ ऐकूनिदचकवाटेमनीं
॥२९॥ हस्तींचाउच्चशब्दहोत ॥ पदातींचाटंकारवत ॥ ऐशानादांहींसर्वजगत ॥
दुमदुमिलेंऋषिवर्या ॥ ३० ॥ देवदैत्यींसोडिलेजेबाण ॥ त्यांचेंजाळेंचिबनलेंपूर्ण॥
त्यायोगेंप्रलयमेघजाण ॥ अकाळींप्राप्तवाटेजनां ॥ ३१ ॥ तयेकाळींदैत्यसेना ॥
शस्त्रांहींशोभापावलीजाणा ॥ केवळविजेचीपंक्तिह्मणा ॥ ऐसीदिसोंलागली ॥

---

ति, दिति, दनु, काला, दनायु, सिंहिका, क्रोधा, प्राधा, इला, विनता, कपिला, मुनी आणि कद्रु ह्या तेरा कन्या कश्यपास दिल्याहोत्या. १ वाद्याचें नांव.

 ॥ ३२ ॥ युद्धेंचंचलझालीसेना ॥ केवळनभींच्याविजाजाणा ॥ बाणजालाच्या आच्छादना ॥ योगेंदुर्दिनवाटतसे ॥ ३३ ॥ तयेरणींभयंकरीं ॥ वृक्षपाषाणपर्वतशिखरीं ॥ युद्धमांडिलेंअसेअसुरीं ॥ देवांसमवेतजाणपां ॥ ३४ ॥ नाराचनामकबाणींकरून ॥ इंद्रकरीतसेनगचूर्ण ॥ कितीएकगजधरून ॥ गजांवरीआदळिती ॥ ३५॥ रथांवरीरथआपटिती ॥ अश्वींअश्वांतेंमारिती ॥ कितीएकदंडेंताडिती ॥ अन्योन्यातेंपर्यंसा ॥ ३६ ॥ गदापरिघघेऊनिहातीं ॥ परस्परांतेंमर्दिती ॥ कितीएकरक्तकर्दमींपडती ॥ मूर्छायुक्तहोऊनियां ॥३७॥ तदनंतरेंदेवगण ॥ विमानींबैसलेससैन्य ॥ देवलोकींजाऊन ॥ दिव्यरूपेंवसतेझाले ॥ ३८ ॥ देवींताडितराक्षस ॥ क्रोधेंबोलतीदेवांस ॥ कांहोकेलेंपलायनास ॥ यावेंयुद्धासिसत्वरी ॥ ३९ ॥ ऐसेंऐकोनियांदेव ॥ मानसींधरूनीमहागर्व ॥ पुनःयुद्धासिआलेसर्वे ॥ ताडणकरितीपरस्परें ॥ ४० ॥ पाषाणघेऊनियांहातीं ॥ भिंडिपालातेंसांवरिती ॥ खड्गयोगेंवरच्यावरती ॥ शिरेंउडवितीतत्वता ॥ ४१ ॥ परशूच्यायोगेंकरून ॥ परिघातेंहस्तींधरून ॥ तोमरेंकरितीपरस्परांचूर्ण ॥ छुरिकाहिधारितीएक ॥ ४२ ॥ कितीएकघेतीकुंतकरीं ॥ कितीएकअसतीपाशधारी ॥ शंकुयोगेंकितिकांसमरीं ॥ ताडणकरितीनिर्दयत्वें ॥ ४३ ॥ अंकुशपट्टीशमुसे 

१ पावसाळा. २ युद्धांतील शस्त्रास्त्रांचीं नांवें. ३ सुऱ्या.

ल ॥ शक्तीवज्रलांगूल ॥ पाशंकोदंडउपलें ॥ मुष्टियुद्धहीहोतसे ॥ ४४ ॥
शूलकुठार[1]प्रासबाण ॥ यांचीवृष्टीहोतसेजाण ॥ अधोमुखखड्‌गधरून ॥ च
क्रकुंतींताडिती ॥ ४५ ॥ क्षुद्रपट्टीशनारांचांहीं ॥ क्षेपणीपाषाण[2]योगेंपाहीं ॥
युद्धमाजलेंव्यासमही ॥ झालीअसेजाणपां ॥ ४६ ॥ देवहीकितीएकअस्त्रां
तें ॥ टाकितीमारावयादैत्यांतें ॥ ऐसेंभयंकरयुद्धतें ॥ सहस्त्रवर्षेंचाललेंसे
॥ ४७ ॥ त्याप्राणघातकयुद्धींजाण ॥ पराभवपावलेदैत्यगण ॥ रणभूमीतें
त्यागून ॥ पलायनकरितेजाहले ॥ ४८ ॥ तयेकालींदक्षसुता ॥ दितीनामकदैत्य
माता ॥ जालीअसेअत्यंतदुःखिता ॥ पुत्रपराभवेंकरूनियां ॥ ४९ ॥ ऐशी
दुःखेंव्याप्तहोऊन ॥ हिमवानपर्वतींकेलेंगमन ॥ तपमांडिलेंदारुण ॥ ममध्यान
धरूनियां ॥ ५० ॥ स्वपुत्रांतेंअखिलसंपत्ती ॥ प्राप्तव्हावीऐशीमती ॥ देवगणांतें
पराभविती ॥ ऐसेंइच्छीसर्वदा ॥ ५१ ॥ ममध्यानरतहोऊन ॥ दुष्करमांडि
लेंतपजाण ॥ एकेचरणींउभीराहून ॥ कांहींकालघालविला ॥ ५२ ॥ कांहींका
लअंगुष्ठावरी ॥ उभीराहूननिर्धारीं ॥ किंचित्कालनिराहारीं[3] ॥ श्रेष्ठतपकरीतसे
॥ ५३ ॥ पक्वझालेलींवृक्षपर्णें ॥ गळूनपडतीत्याभक्षणें ॥ जोचिदानंदमीत्यामा
झ्याध्यानें ॥ काळक्रमणाकरीतसे ॥ ५४ ॥ देवांचींसहस्त्रवर्षेंजाण ॥ तपमांडिये

---

१ युद्धांतील शस्त्रास्त्रांचीं नावें. २ दगड. ३ कांहीं नखातां.

 लेंदारुण ॥ विश्वतारकमीत्यातपेंकरून ॥ प्रसन्नजहालोंतियेसी ॥ ५५ ॥ त्या 
स्थानींहोऊनिप्रत्यक्ष ॥ पुण्यहस्तेंकेलास्पर्श ॥ दितीह्मणेममांगास ॥ स्पर्शको
 णकरीतसे ॥ ५६ ॥ सूतह्मणेशौनकादिकां ॥ ऐसीयेतांदितीसशंका ॥ ब्रह्मदेवबो 
लिलानिका ॥ दैत्यमातेमीप्रसन्नअसें ॥ ५७ ॥ बहुतदिवसपर्यंत ॥ तपकेलेंसिहो
ऊनिश्रांत ॥ कायइच्छाअसेमनांत ॥ विदितकरींमजप्रती ॥ ५८ ॥ इच्छावसेजे
तवमानसीं ॥ वरमागदेतोंनिश्चयेंसीं ॥ भीतीनधरींमानसीं ॥ कल्याणतुझेंहोई
ल ॥ ५९ ॥ दितीबोलेतयेकाळीं ॥ तूंअससीसर्वांतबळी ॥ पुत्रदेईमजअतुबळी ॥
देवगणांसाजिंकितीऐसे ॥ ६० ॥ त्रैलोक्यींकोणीनजिंकीत्यांतें ॥ ऐसेतीनपुत्रदेई
मातें ॥ तेव्यापितीत्रैलोक्यसत्तें ॥ शूरअसावेअत्यंत ॥ ६१ ॥ देवदेवपितामह ॥
भक्तांवरीकरिसीअनुग्रह ॥ एवढामाझाहाआग्रह ॥ चालवावादेवराया ॥ ६२ ॥
दक्षात्मजेचेंतेंवचन ॥ सृष्टिजनकेंकरूनिश्रवण ॥ तियेसीबोलिलाभाषण ॥ श्रव
णकराहोऋषिवर्या ॥ ६३ ॥ अवध्यहोतीलसर्वभूतीं ॥ देवादिकत्यासिभीती ॥
बलाचीहोईलसीमाती ॥ दैत्यमातेजाणपां ॥ ६४ ॥ तथापिअसेएकखूण ॥ 
एकाशंकरावांचून ॥ अजिंकअसतीत्रिजगींजाण ॥ असत्यनोहेकल्पांतीं ॥ ६५ ॥

१ श्रमित. २ स्वर्ग, मृत्यु, पाताळ, यांमध्यें. ३ हट्ट. ४ कोणीही मारणार नाहीं. ५ संकेत, ह्मणजे जगामध्यें कोणीही मारणार नाहीं हें खरें, तथापि शंकरापासून मात्र त्यांना भीती आहे.

सूतह्मणेशौनकादिकांतें ॥ ऐसावरदेऊनिदितीतें ॥ अंतर्धानपावलात्याचिस्था
नातें ॥ स्वप्रभावेंकरूनियां ॥ ६६ ॥ श्रेष्ठअसेजोसर्वजगता ॥ त्याप्राचेतसदक्षा
चीसुता ॥ पावोनिऐशावरातत्वतां ॥ स्वस्थानातेंप्राप्तझाली ॥ ६७ ॥ तदनंतरें
तीकश्यपसती ॥ होतीझालीगर्भवती ॥ डोहळेउत्तमातिजप्रती ॥ होतेझालेतेध
वां ॥ ६८ ॥ दैत्यमातेसिप्रसूतिकाळीं ॥ तीनपुत्रजहालेअतुर्बळी ॥ त्यांचेसमान
भूमंडळीं ॥ कोणीहीनसेबळिष्ठ ॥ ६९ ॥ जन्मकाळींकश्यपसत्वर ॥ करीजात
कादिसंस्कार ॥ दिसूनिआलेंकोणीशूर ॥ त्रिजगींनसेयांसम ॥ ७० ॥ वर्तवूनि
जातकर्म ॥ त्रिपुरऐसेंतिघांनाम ॥ ठेविलेंअसेसप्रेम ॥ कश्यपानेंतत्वतां ॥७१॥
तयेकाळींतेत्रिपूर ॥ स्वभावेंअसतीअतिक्रूर ॥ स्वर्गपाताळभूमीवर ॥ राज्यकरि
तीहर्षयुक्त ॥ ७२ ॥ तदनंतरेंएकेअवसरीं ॥ देवदैत्ययुद्धसमरीं ॥ होतेंझालेंत्या
चीपरी ॥ वर्णनकरण्याअशक्य ॥ ७३ ॥ कितीएकमुसलघेतीहातीं ॥ एकमेकां
तेंमारिती ॥ परिघयोगेंपाडितीक्षिती ॥ परस्परातेंपरियेसा ॥ ७४ ॥ किती
एककरितीबाणवृष्टी ॥ सूर्यमंडळनदिसेदृष्टी ॥ तेणेंभ्यालीअखिलसृष्टी ॥ कल्पां
तहोतोऐसेंवाटे ॥ ७५ ॥ गदाधारीतयेरणीं ॥ युद्धकरितीनिकरेंकरूनी ॥ शक्ति
योगेंकितीजणीं ॥ अपारसैन्यमारिलें ॥ ७६ ॥ ऐसेतेदेवदैत्यजाण ॥ युद्धकरि

१ अदृश्य. २ कश्यपानें जातकर्मादि संस्कार केले त्यावेळीं या त्रिपुरासुरांप्रमाणें जगामध्यें कोणीही बली नाहीं असें त्याला समजलें.

तीक्रोधेंकरून ॥ परस्परांतेंकरितीताडण ॥ निष्ठुरत्वेंपरियेसा॥७७॥ऐसेंयुद्धहोतां
जाणा ॥ त्रिपुरींजिंकिलीदेवसेना ॥ देवींकेलेंपलायना ॥ सुवर्णपर्वतींभीतीनें ॥
॥४॥ ॥ ७८ ॥ तेत्रिपुरक्रूरअती ॥ त्रिजगामाजीराज्यकरिती ॥ भूर्भूवादिलोकींसम ॥२॥
स्तीं ॥ स्वामित्वआपुलेंस्थापिलें ॥ ७९ ॥ तयांचींअसतीतीनपुरें ॥ तयांसीअसती
रौप्यद्वारें ॥ आंतअसतीसुवर्णमंदिरें ॥ भ्रमणकरितीसर्वलोकीं ॥ ८० ॥ याप्रका
रेंत्यादैत्यांनीं ॥ सर्वलोकजिंकूनि॥आपुलेसेकरोनि ॥ ठेविलेअसतीतत्वतां॥८१॥
सर्वलोकांचेंस्वामीपण ॥ तिघेचिचालवितीजाण ॥ स्वतांचिहोऊनिसूर्यनंदन ॥
न्यायकरितीपापपुण्याचा ॥ ८२ ॥ आपणचिअग्निहोऊनिक्षिती ॥ पाकनिष्प
त्तीकरविती ॥ यज्ञांचियाआहुतीभक्षिती ॥ देवांनमिळेहविर्भाग ॥ ८३ ॥ आप
णचिहोऊनिपाशी ॥ जलपुरवितीसर्वांशी ॥ क्षुद्रप्राणियांजलचरांशीं ॥ जीववि
तीनिश्चयें ॥ ८४ ॥ आपणचिहोऊनिकुबेर ॥ द्रव्यपुरवितीपृथ्वीवर ॥ आपण
चिघेतीकरभार ॥ सर्वलोकांपासुनी ॥ ८५ ॥ असोऐशापरीजाण ॥ सर्वलोक
जिंकून ॥ आपुलेंस्वामित्वस्थापून ॥ देवपळविलेकांतारीं ॥ ८६ ॥ त्यांचेंपाहूनि ॥४॥
साध्वस ॥ मुनिजनींटाकूनितपास ॥ पलायनकेलेंधरूनिभीतीस ॥ ठावजेथेंमि
ळेजया ॥ ८७ ॥ वेदाध्ययनटाकिलेंब्राह्मणीं ॥ पलायनकेलेंतत्क्षणीं ॥ त्रिपुरां

१सोन्याचा पर्वत. २ स्वर्ग, मृत्यु, पाताळादि सर्व लोकांमध्यें. ३ यम. ४ वरुण. ५ मोठ्या अरण्यांत. ६ साहस.

चीभीतीअसल्याकारणीं ॥ धोत्रेंगळतीब्राह्मणांचीं ॥८८॥ यज्ञकुंडेंजेथेंअसती॥ त्रिपुरदूतविध्वंसिती ॥ तयांसीनसेपापक्षिती ॥ दुष्टअसतीदुरात्मे ॥८९॥ याप्रकारेंपुण्यस्थानें ॥ उद्ध्वस्तकेलींदैत्यसेनेनें ॥ तेंपाहोनियांऋषिमनें॥दुःखीझालीं अत्यंत ॥९०॥ ऐशाप्रकारेंतेराज्यकरिती ॥ प्रजाजनांचीसंपत्तिहरिती ॥ तयांची असेक्रूरमती ॥ पीडादेतीसर्वांतें ॥ ९१ ॥ अग्नीनेंदाहकत्वत्यागिलें ॥ नद्यांनीं आपुलेमार्गसोडिले ॥ चंद्रसूर्यतेजहीनझाले ॥ त्रिपुरभीतीनेंजाणाहो ॥ ९२ ॥ दिग्वधूंचींवदनेंतदा ॥ मलीनझालींअसतीसर्वदा ॥ ऐशियाभोगितीआपदा ॥ विपरीतकाळआलाअसे ॥ ९३ ॥ धर्मकृत्येंबंदझालीं ॥ पुण्यक्षेत्रेंनाशपावलीं ॥ यज्ञस्थानेंमोडोनिगेलीं ॥ स्वधर्मटाकिलासर्वांनीं ॥ ९४ ॥ वृक्षसदैवपरिपूर्णफलीं ॥ फुलोंलागलेअकालीं ॥ देवस्त्रियाबंदिशाळीं ॥ त्रिपुरदैत्यींघातिल्या ॥ ॥ ९५ ॥ देवकेलेअरण्यवासी ॥ त्रिपुरआनंदलेमानसीं ॥ सुरगणकरितीविचारासी ॥ पुढेंकायकर्तव्यआतां ॥ ९६ ॥ देवमनुष्यस्वगृहांप्रती ॥ काहींकालेंप्राप्तहोती ॥ पूर्वींप्रमाणेंवर्तती ॥ तथापित्रिपुरआज्ञांकित ॥९७॥ ऐशियातेदुःखींत्रस्त ॥ मनेंझालींअस्वस्थ ॥ कायकरावेंयाविचारींग्रस्त ॥ सर्वजनतयेकाळीं ॥ ९८ ॥ सूतह्मणेशौनकादिकां ॥ भीमामाहात्म्यउत्तमऐका ॥ त्यांतीलहेंत्रिपुराख्यानलो

१ नाहींशीं करिती २ मोडून तोडून टाकिलीं ३ अग्नि, नद्या, चंद्र सूर्य, इत्यादिकांनीं आपआपले धर्म टाकिले.

कां ॥ प्रियवाटोअत्यंत ॥९९॥ हीकथापूर्वीनारदाकारणें ॥ सांगीतलीपितामहा
नें ॥ तीचकथायथामतीनें ॥ तुह्मांप्रतिकथियेली ॥ १००॥ रामाश्रयेंकरूनिजाण
॥ ह्याकथेचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ १०१ ॥ इतिश्री
पद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ त्रिपुराख्या
नकथनं नाम द्वितीयाध्यायरसाळहा ॥ २ ॥ ॥ ओंव्या संख्या ॥१६६॥



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीमातापितृभ्यांनमः ॥ ॐनमोजीकामांतकाचित्तरंजना ॥ मदमत्सरविपिनदहना ॥ भवसागरबंधननिकृंतना ॥ दाक्षायणीरंजनाभवनाशका ॥ १ ॥ हिमालयजामाताचंद्रशेखरा ॥ गजवदनपितयाकर्पूरगौरा ॥ लक्ष्मीकांतमनरंजनात्रिपुरहरा ॥ त्रिदोषशमनात्रिलोकेशा ॥२॥ मागीलअध्यायाचेअंतीं ॥ दैत्यींहरणकेलीस्त्रीसुतसंपत्ती ॥ देवगेलेअरण्याप्रती ॥ विचारकरितीमुक्तव्हाया ॥ ३ ॥ ब्रह्मनिष्ठमहातापसी॥शौनकादिसर्वऋषी॥नमनकरूनिसूतासी॥ह्मणतीपुढेंकथासांगा॥४॥देवझालेपदच्युत॥त्यांसिपुनरपिस्थानप्राप्त॥कोणेंउपायेंझालेंतेंत्वरित॥आह्मांप्रतीनिवेदावें॥५॥सूतह्मणेशौनकादिकांतें॥प्रश्नकेलाउपकारातें॥याचरित्रश्रवणेंलोकांतें॥उत्तमगतिहोईल॥६॥प्राप्तहोईलधनसंपत्ती॥नष्टहोईलसर्वविपत्ती॥पितामहेंकथासांगीतलीनारदाप्रती ॥ तीचतुह्मांसिनिवेदितों॥ ७ ॥ विधिह्मणेनारदातें ॥ पुढेंकरींचरित्रश्रवणातें ॥ नकौटिल्येंअसद्वृत्तें ॥ जनांलागींमहत्त्व ॥८॥ एकआपुलेंस्थानश्रेष्ठ ॥ दैवयोगेंहोतांभ्रष्ट ॥ प्राप्तहोतीबहुतकष्ट ॥ लघुत्वप्राप्तहोतसे ॥९॥ दैवेंप्राप्तहोतांविपत्ती ॥ ज्यांचीभ्रमनपावेमती ॥ जगामाजीतेश्रेष्ठअसती ॥ देवजाणातेचिकीं ॥ १० ॥ आधींउच्चत्वमगलहानपण ॥ तयाचेहुनीश्रेष्ठमरण ॥ ल

१ शंकरा. २ स्थानभ्रष्ट. ३ सुख अथवा दुःख प्राप्त झालें असतां ज्यांची बुद्धि चंचल होत नाहीं तेच धन्य.

भी.मा. घुत्वअसतांमहत्त्वजाण ॥ प्राप्तहोईलतोधन्य ॥११॥ निकृष्टदशेंतअमरत्व ॥ तोंचे अ०
जाणावेंदाहकत्व ॥ जगींनिंदितीसर्वसत्व ॥ त्यासमदुःखीअन्यनाहीं ॥ १२ ॥ ध
॥ १ ॥ नवंतअसोनिगर्वनाहीं ॥ दरिद्रीअसतांदुःखनाहीं ॥ तोचिजगींजीवंतपाहीं ॥ ज ॥ ३ ॥
गामाजीवंद्यते ॥ १३ ॥ कधींहोईप्राप्तसंपत्ती ॥ कदाचितप्राप्तविपत्ती ॥ कोण
तीहीअसतांस्थिती ॥ धीरेंधैर्यनसोडावें ॥ १४ ॥ पुण्यपापजैसेंपदरीं ॥ तद्योगेंसं
पत्तिविपत्तीचीपरी ॥ जैशाअसतीसागरलहरी ॥ उच्चत्वपावोनिनष्टहोती ॥१५॥
जयासीप्राप्तअसेआपदा ॥ दैन्यदावीजनांसदा ॥ तयासीसुखनसेकदा ॥ इहपरत्र
दोन्हीनाहीं ॥१६॥ विपत्तीमाजीजेअसतीधीर ॥ तयांइहलोकींसुखअपार ॥ स्वर्गलो
कहीप्राप्तसत्वर ॥ ह्मणोनिधैर्यनसोडिजे ॥ १७ ॥ देवांसीविपत्तिआल्याकारणें ॥ स्व
रुथानेंसोडुनीभोगितीकाननें ॥ विचारकरितीस्वरुथानें ॥ प्राप्तहोतीकैशापरी ॥१८॥
उन्मत्तझालेअसतीत्रिपुर ॥ त्यांचाकरावयासंहार ॥ समर्थअसेएकाचिशंकर ॥
अन्यांबलनसेची ॥१९॥ ऐसाविचारकरूनिमनीं ॥ तैसेचिलोटितीदिनरजनीं ॥
सुवर्णाद्रीचेकाननीं ॥ दुःखेंकरूनिराहती ॥२०॥ ऐसेचिकांहींकालपर्यंत ॥ वसत
होतेत्यावनांत ॥ पुढेंशरणगेलेभीमाशंकराप्रत ॥ भीमाचलींसर्वदेव ॥ २१ ॥ देव ॥ १ ॥
ह्मणतीशंकराप्रती ॥ नजाणसींकींआमुचीविपत्ती ॥ आह्मींवसतसोंकाननाप्र

१ सर्व प्राणी. २ यालोकीं सुख नाहीं व अंतीं स्वर्ग प्राप्तिही नाहीं. ३ दुःख.

ती ॥ त्रिपुरेंसर्वस्वहरियेलें ॥ २२ ॥ तरीआमुच्यारक्षणाकरितां ॥ त्रिपुरवधावेतु
ह्मीतत्वतां ॥ दूसराउपायनसुचेआतां ॥ आह्मांसिईश्वराजाणपां ॥ २३ ॥ याप्र
कारेंदेववचन ॥ वृषभध्वजेंश्रवणकरून ॥ हास्यकेलेंविनोदान ॥ देवांप्रतीकाय
बोले ॥२४॥ कोणसांगतांतुह्मींत्रिपुर ॥ वसतोकोठेंसांगासत्वर ॥ उन्मत्तहोण्या
सींकोणाचावर ॥ कारणझालासांगाहो ॥ २५ ॥ देवह्मणतीपिनाकधरा ॥ पि
तामहेंदीधलेंदितीतेंवरा ॥ त्रिभुवनामाजीत्रिपुरांजिंकिणारा ॥ शंकरावांचोनीअ
न्यनसे ॥ २६ ॥ ऐसेंभाषणकरितांश्रवण ॥ क्रोधेंसंतप्तजेंविकृशान ॥ बरोबरिघे
तलेभूतगण ॥ युद्धालागींनिघाला ॥ २७॥ अपारसैन्यघेऊनिसांगाती ॥ सो
डूनियांभीमाचलाप्रती ॥ खालेंआलात्वरितगती॥वाटेकल्पांतहोईलआतां ॥२८
भीमाद्रीचियेअधःप्रदेशीं ॥ तयाउन्मत्तत्रिपुरांसरशीं ॥ शंकरेंमांडिलेंयुद्धासीं ॥
देवपाहतीकौतुक ॥ २९ ॥ प्रमथाधिपाचीसेना ॥ क्रोधेंकरोनीआलीरणा ॥ तये
कालींत्रिपुरराणा ॥ मनींसाशंकजाहला ॥३०॥ भेरीमृदंगादिकाचाध्वनी ॥ शं
खतूर्यादिकांचेनिस्वनीं ॥ धनुष्यादिटणत्कारणीं ॥ रणींकोलाहलजाहला॥३१॥
गजादिकांचेंबृंहित॥ अश्वांचामहच्छब्दहोत ॥ रथांचागडगडाटबहुत ॥ धरणीते
णेंकांपतसे ॥ ३२ ॥ अग्न्यादिपाशुपतास्त्रसोडिती ॥ बाणघर्षणीअग्नीनिघती॥

१वृषभआहे ध्वजाचेठायीं ज्याच्या,अशा शंकरानें. २ अग्नि. ३ भीमपर्वताचे खालीं सपाट जाग्यांत. ४ धनुष्यादि आयुधांचा शब्द.

जेंवीविद्युल्लताचमकती ॥ तेंवींनभशोभतसे ॥ ३३ ॥ शंकरेंमारिलीदैत्यसेना ॥ दै
त्यींमारिलेंशिवगणा ॥ तेणेंरक्तमांसमग्ना ॥ भूमीजाहलीअत्यंत ॥ ३४ ॥ गणर
॥ २ ॥ णींपडलेपाहून ॥ भयव्याप्तजाहलेअन्यगण ॥ त्यांहींकेलेंपलायन ॥ शंकराजव ॥ ३ ॥
ळीमिळाले ॥ ३५ ॥ याप्रकारेंकोलाहल ॥ शंकरेंश्रवणकेलासकळ ॥ बरोबरीघे
ऊनिगणबळ ॥ वृषभारूढजाहला ॥ ३६ ॥ हास्यकरूनरणींधांवत ॥ दैत्यसेना
संहारित ॥ दैत्यपडलेरणींबहुत ॥ अन्यभयार्तजाहले ॥ ३७ ॥ दैत्यींशंकराप्र
तिपाहून ॥ त्रिपुरशस्त्रास्त्रयुक्तहोऊन ॥ मानसींअत्यंतक्रोधभरून ॥ शंकरावरी
धांवले ॥ ३८ ॥ दैत्यक्रोधेंभाषणकरित ॥ युद्धचिआमुचाआहारनिश्चित ॥ आमु
चेंसैन्यमारिलेंकिंचित ॥ कायपुरुषार्थकेलासी ॥ ३९ ॥ जेंकांहींअसेलतवांगीब
ळ ॥ आतांआह्मांतेंदाखवींसकळ ॥ आतांनलावावावेळ ॥ स्मशानवासीशंकरा ॥
॥ ४० ॥ ऐसेंबोलूनियांभाषण ॥ शंकरासीकरावयाताडण ॥ दैत्यींसोडिलेअमि
तबाण ॥ रुद्रावरीतेधवां ॥ ४१ ॥ बाणअनिवारआलेपाहून ॥ शंकरेंबाणकाढि
लेतीक्ष्ण ॥ त्यायोगेंतेतोडिलेसंपूर्ण ॥ क्षणएकनलगतां ॥ ४२ ॥ तदनंतरेंरथध्व
ज ॥ छत्रधनुष्यहीसहज ॥ छेदूनिटाकिताजाहलाअज ॥ क्षणएकनलगतां ॥ ४३ ॥ ॥ २ ॥
जयांचेंधनुष्यरथनष्ट ॥ जाहलेंअसतांहीक्रोधिष्ठ ॥ गदाघेऊनिदैत्यश्रेष्ठ ॥ शंक

१ आच्छादित. २ गलबला. ३ ज्याला जन्म नाहीं असा.

रावरीधांवले ॥ ४४ ॥ क्रोधेंजोंवरीधांवतयेत ॥ तोंवरीशंकरअत्यंत ॥ तीक्ष्णबा
णींगदाछेदित ॥ तत्काळतयादैत्याची ॥ ४५ ॥ तयेकाळींप्रमथाधिप ॥ अत्यंत
उग्रधरीस्वरूप ॥ तृतीयनेत्रींज्वालाअमूप ॥ निघोंलागल्याअग्नीच्या ॥ ४६ ॥
ऐसेंविक्राळस्वरूपपाहून ॥ समोरराहोंनशकतीदितिनंदन ॥ त्यांहींकरूनिपलाय
न ॥ अदृश्यझालेस्वपुरींते ॥ ४७ ॥ त्रिपुरअसतीदेवरिपू ॥ पळालेपाहूनिप्रम
थाधिपू ॥ अभ्यास्त्रसोडिलेंतेजअमूपू ॥ त्रिपुरेंदहनकेलींत्यांचीं ॥ ४८ ॥ पुरेंदग्ध
झालीं पाहून ॥ दैत्यआलेकरावयारण ॥ पुनरपीसोडूनिअग्निमयबाण ॥ शंकरें
जाळिलेत्रिपुरासुर ॥ ४९ ॥ तेंयुद्धजाहलेंअत्यंत ॥ त्यायोगेंरुद्रेंश्रमत ॥ देहझा
लास्वेदेंयुत ॥ भीमेश्वराचातेवेळीं ॥ ५० ॥ तेव्हांपासूनिआजपर्यंत ॥ भीमेश्वरा
सीघर्मअत्यंत ॥ त्याघर्माचेंजलहोत ॥ भीमानदीतीजाणिजे ॥ ५१ ॥ तेंजलअ
सेपुण्यदायक ॥ स्नानमार्जनकरितांलोक ॥ पुण्यवंतहोतीनिष्कलंक ॥ भुक्तिमु
क्तिप्राप्ततयां ॥ ५२ ॥ तीभीमाजाणालोकमाता ॥ तीचीयोग्यतानयेअमृता ॥ त
त्संयोगेंनिरोगता ॥ प्राप्तहोईजनांतें ॥ ५३ ॥ स्मरणकरितांपापनाश ॥ स्पर्शेंक
रूनिउतरेविष ॥ उपासनाकरावीनिरालस ॥ सिद्धिहोईलतात्काळ ॥ ५४ ॥ भी
माअसेतीर्थराज ॥ त्रिपुरवधींउत्पत्तिसहज ॥ मृत्युलोकींआणीभीमराज ॥ मनु

---

१ भयंकर. २ शंकर. ३ घर्माशीं सहित.

 ष्योद्धाराकारणें ॥ ५५ ॥ हीकथापूर्वीब्रह्मदेवानें ॥ सांगीतलीनारदाकारणें ॥ ती 
चकथायथाबुद्धीनें ॥ तुह्मांप्रतीनिवेदिली ॥ ५६ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ ह्या
 कथेचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ५७ ॥ इतिश्रीपद्मपुरा ॥ ३ ॥
णे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रेसूतकथितकथाकल्पतरौ त्रिपुरदहनंभीमाउत्प
त्तिकथनंनामतृतीयाध्यायरसाळह्या ॥ ३ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ २२३ ॥ ॥



॥ ३ ॥

# अध्याय ४ था.






श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ ॐनमोजी शिवामंगळधामा ॥ स्वीयजनहृदयआरामा ॥ भक्तजनांचियापूरितकामा ॥ नामानामातीतं ॥ १ ॥ वैकुंठभगिनीमानसरंजना ॥ षडाननजनकामीनकेतनदहना ॥ ब्रह्मानंदात्रिनयना ॥ भवनाशनात्रिपुरांतका ॥ २ ॥ सूतह्मणेशौनकादिकांप्रती ॥ मागीलअध्यायाचेअंतीं ॥ शंकरेंजाळिलेंत्रिपुरांप्रती ॥ भीमेचीउत्पत्तिवर्णिली॥३॥ तीकथाअसेसुधारस ॥ श्रवणींदृढकरामानस ॥ नारदह्मणेब्रह्मदेवास ॥ भीमाचरित्रपुढेंसांगा ॥ ४ ॥ त्रिपुरासुरवधानंतर ॥ शंकरांगासीआलास्वेदपूर ॥ तोआणीकैसाराजेंद्र ॥ तोप्रकारमजसांगा ॥ ५ ॥ भीमरथनामकक्षत्रिय ॥ मृत्युलोकीं भीमाआणिताहोय ॥ तयाचाहेतूअसेकाय ॥ मजसींनिवेदाकृपेनें ॥ ६ ॥ पितामहवदेतयेकाळीं ॥ भीमाआणिभीमरथबली ॥ तेंसविस्तरचारित्रतुजजवळी ॥ निवेदितोंप्रीतिस्तव ॥ ७ ॥ सूर्यवंशोद्भवराजा ॥ भीमरथमहातेजा ॥ जयाचीसंतुष्टसदाप्रजा ॥ अयोध्याधिपतीशूरतो ॥ ८ ॥ पितृपितामहादिकांचेंराज्य ॥ करीतहोतासाम्राज्य ॥ तयाचेनगरींसुखभ्राज्य ॥ रोगव्याधीरहितअसे ॥ ९ ॥ दुर्भिक्षकधीं दिसेना ॥ अनावृष्टीहोईना ॥ ब्राह्मण,क्षत्रिय,वैश्य,शूद्रजना ॥ आनंदअसेसर्वदा ॥ १० ॥ ब्रह्मचारीआणिगृहस्थ ॥ संन्यासआणिवानप्रस्थ ॥ सदासर्वदा

---

१ तेजःपुंज. २ पुष्कळ. ३ दुष्काळ.

अंतःकरणस्वस्थ ॥ दुःखनाहेकदाकाळीं ॥ ११ ॥ याप्रकारेंपृथ्वीपालन ॥ सप्त
द्वीपांपर्यंतजाण ॥ करीतसेतोआनंदोन ॥ पुत्रवत्प्रजालेखीतसे ॥ १२ ॥ संपूर्ण
धर्मीरतमन ॥ सर्वज्ञअसेअखिलधर्मज्ञ ॥ असत्यनेणेकदाभाषण ॥ यज्ञयागादि
करीतसे ॥ १३ ॥ स्वरूपेंअसेमदनासमान ॥ दर्शनप्रियचंद्राहून ॥ धैर्याचामेरू
चिजाण ॥ धर्माचरणींधर्मराजतो ॥ १४ ॥ सर्वलक्षणींपरिपूर्ण ॥ सर्वशास्त्रांचेंअ
सेज्ञान ॥ अखिलसंपत्तीप्राप्तहोऊन ॥ सौख्येंसदानांदतसे ॥ १५ ॥ पराक्रमी
असेअत्यंत ॥ सुहृदांचेंकरीपरमहित ॥ कोणेकाळींमृगयार्थ ॥ वनामाजीप्रवेश
ला ॥ १६ ॥ तोमृगयाकर्मीअसेहुषार ॥ सिंहव्याघ्रादिप्राणीक्रूर ॥ तयांतेंविंधी
सोडूनिशर ॥ अतिचपलत्वेंकरूनियां ॥ १७ ॥ तोमहारथीमृगयाव्यसनीं ॥ अ
त्यंतआसक्तहोवोनी ॥ सिंहव्याघ्रांदिकांच्याहननीं ॥ सक्तहोवोनिवनींहिंडे ॥ १८
तयेस्थानींएकआश्रम ॥ वृक्षवल्लींहींमनोरम ॥ तयातेंनजाणोनिसप्रेम ॥ मृग
याकरीआनंदें ॥ १९ ॥ शालतालआणितमाल ॥ बिल्वतिंतिडींबकुळ ॥ जंबीर
चिरंबिल्वपाटल ॥ वृक्षशोभतीनानाविध ॥ २० ॥ येणेंपरीरमणीयआश्रम ॥ ना
नाविधअसतीद्रुम ॥ मृगयाकरीराजाभीम ॥ अत्युत्साहेंकरूनियां ॥ २१ ॥ त
येस्थानींएकधर्मात्मा ॥ तेजेंउणेसूर्यचंद्रमा ॥ पितरदेवऋषिद्विजोत्तमा ॥ पूजी

१ मानीतसे. २ मित्रांचें. ३ भेदी. ४ चिंच. ५ करंज. ६ पाडळी. ७ मनोहर.

निरंतरभक्तीनें ॥ २२ ॥ नित्यपंचमहायज्ञकरी ॥ अतिथीकोणीआलियाद्वारीं ॥ भक्तीनेंतयातेंसत्कारी ॥ मनोभावेंकरूनियां ॥ २३ ॥ असोऐशियेपरीजाण ॥ कालक्रमणकरीब्राह्मण ॥ इच्छाझालीविषयसेवन ॥ करणेंऐसीतयातें ॥२४॥ ऐसें मनींयेतांतयेवेळीं ॥ मृगरूपधरिलेंतात्काळीं ॥ त्याचीस्त्रीहिउतावळी ॥ मृगीजाहलीपरियेसा ॥ २५ ॥ अत्यानंदेंक्रीडाकरिती ॥ स्वसौख्यार्थवनींविचरती ॥ इतुक्यांतभीमराजेंनिशांतीं ॥ बाणींतयांतेंविंधिलें ॥ २६ ॥ मर्मस्थानींहोतांप्रहार ॥ शोककरितीअपार ॥ कोणब्रह्मघ्नदुराचार ॥ आलाह्मणतीयेस्थानीं ॥ २७ ॥ येणेंपरीतयांचेंभाषण ॥ श्रवणकरितांराजाआपण ॥ हळूहळूजवळयेऊन ॥ विप्रदंपत्यपाहिलें ॥ २८ ॥ क्रीडासक्तअसतांब्राह्मण ॥ आपणमारिलानिरपराधेंबाण ॥ मूर्छाआलीतत्क्षण ॥ राजयातेंपरियेसा ॥ २९ ॥ दीर्घमूर्छाजाहलीप्राप्त ॥ निश्चेष्टजाहलाकाळबहुत ॥ तदनंतरेंसावधहोत ॥ निंदूनिघेईआपणातें ॥ ३० ॥ ब्रह्मघ्नमीदुराचारी ॥ व्यर्थताडिलेंब्राह्मणाशरीं ॥ दुःखकरितयेणेंपरी ॥ क्षत्रियावतंसभीमराजा ॥३१॥ तदनंतरतयांतेंउचलून ॥ राजाचालिलाघेवोन ॥ आश्रमामाजीजावोन ॥ औषधोपचारकरीतयां ॥ ३२॥ नानाविधलेपकरी ॥ तयांचींक्षतेंझालींबरीं ॥ मगराजासपरिवारीं ॥ जावयासिद्ध

१ रात्रिभागीं. २ ब्रह्महत्याकरणारा. ३ आपली निर्भर्त्सनाकरी.

जाहला ॥ ३३ ॥ स्वदृष्टीनें क्षतअवलोकिलें ॥ मांसयोगें भरोनीआलें ॥ नंतर अ
योध्येप्रतीगमनकेलें ॥ सपरिवारें[1] परियेसा ॥ ३४ ॥ मनीं दुःखअत्यंतकरित ॥ पा
पनाशकप्रायश्चित्त ॥ घ्यावें ह्मणोनि घडलेलें सर्ववृत्त ॥ वसिष्ठातें निवेदित ॥ ३५ ॥
वसिष्ठबोलेराजाप्रती ॥ ब्रह्महत्येसमानपापानिगुती ॥ याचीव्हावयानिष्कृती ॥
उपायसांगतों ऐकराया ॥ ३६ ॥ ब्राह्मणबोलवावेबहुत ॥ दक्षिणाद्यावीत्यांअपरि
मित ॥ दोषगेलाअसें जोबोलत ॥ ब्रह्महत्यारीतोजाणा ॥ ३७ ॥ जरीअसेलशा
स्त्रज्ञ ॥ अथवाअसेलवेदज्ञ ॥ शास्त्राधारें बोलतांजाण ॥ दोषनसेकोणातें ॥ ३८ ॥
शास्त्राधारकांहींनजाणतां ॥ व्यर्थचीहोयजरीबोलता ॥ हादोषवसोतयाचेमाथां ॥
पापरहितहोशीलतूं ॥ ३९ ॥ ब्राह्मणजरीगर्वें बोले ॥ ब्रह्महत्यारीत्यातें बोलें ॥ प
रनिंदाकरितांझालें ॥ ब्रह्महत्यासमपातक ॥ ४० ॥ असत्यभाषणमुखेंउच्चारी ॥
स्वकर्माचात्यागकरी ॥ अन्यजनातें वाग्बाण[2]मारी ॥ तोब्रह्मघातकीजाणावा ॥ ४१ ॥
दांभीकआचारनित्यकरित ॥ प्रतिग्रहजयातें प्रियवाटत ॥ प्राणिवधकरावयाउ
द्युक्त ॥ ब्रह्मघातकीजाणातो ॥ ४२ ॥ अधर्माचरणासीअनुमत ॥ करावयाब्रा
ह्मणघात ॥ ब्राह्मणाटाकीबंधनांत ॥ ब्रह्मघातकीजाणातो ॥ ४३ ॥ अपमानक
रितांब्राह्मणाचा ॥ सन्मानकरितांदुष्टांचा ॥ जगामाजीब्रह्मघ्नसाचा ॥ कोणी

१ सैनिकजनाशींसहवर्तमान. २ मर्मभेदकशब्दांनीं ताडण करणें.

हिंसेतयापरी ॥४४॥ तुझियेहातूनिदोषघडला ॥ ब्रह्महत्येसमानझाला ॥ त्याचादोषजावयावहिला ॥ भीमाआणींभूमीतें ॥ ४५ ॥ भीमेश्वराचेअंगींजेंजल ॥ पुण्यपावनअसेनिर्मल ॥ तयाचेंमार्जनकरितांतात्काळ ॥ तेणेंपवित्रहोशीलतूं ॥ ॥ ४६ ॥ येणेंप्रमाणेंवसिष्ठवचन ॥ जेंश्रवणकरितांचीपापनिरसन ॥ तेंशिरसावंद्यकरून ॥ गमनकेलेंभीमाचलीं ॥ ४७ ॥ जाऊनियांतयेस्थानीं ॥ घोरतपमांडिलेंनिश्चयेंकरूनी ॥ प्रसन्नहोईलशूलपाणी ॥ तेव्हांचिसोडीनतपातें ॥ ४८ ॥ ग्रीष्मऋतूमाजीजाण ॥ चारीदिशेंसीअग्नीठेऊन ॥ सूर्याकडेलावूनिलोचन ॥ भयंकरतपकरी॥ ४९॥पर्जन्यकालींवस्त्रधारण ॥ शीतकालींदिगंबरजाण ॥ उष्णकालींपंचाग्निसाधन ॥ येणेंपरीतपकरी ॥ ५० ॥ जरीवातसूटलाप्रचंड ॥ अथवावातरहितब्रह्मांड ॥ तथापिसुखदुःखरहितचंड[2] ॥ पर्वतजेंवीहिमालय ॥ ५१ ॥ तेजेंशोभेअग्नीसम॥स्वभावेंशांतजैसाचंद्रम ॥ ऐसीतपश्चर्याकरीभीम ॥ श्रवणकराहो मुनिवर्या ॥५२॥ भीमरथराजाबली॥शंकराचीस्तुतीआरंभिली॥तुझियामहत्त्वाची खोली[3]॥वेदशास्त्रां अतर्क्य[4]॥५३॥भक्तीनेंहीदुष्प्राप्य॥शिवनामअसेकल्याणमय ॥ मीअल्पमतीस्तुतीकरूंकाय ॥ नमस्कारअसोतुझेचरणीं ॥ ५४ ॥ येणेंप्रकारेंशंकरस्तविला ॥ शिवमनींअत्यंतसंतोषला ॥ भीमरथापुढेंउभाराहिला ॥ प्रसन्नव

---

१ स्वीकारून. २ मोठा. ३ मोठेपणाचाअंत. ४ तर्कहीकरितां येत नाहीं.

दनपरियेसा ॥ ५५ ॥ उमेसहितशूलपाणी ॥ वेष्टितअसेगणेशादिगणीं ॥ भीम
रथासीप्रसन्नहोउनी ॥ वचनबोलिलातेंऐका ॥ ५६ ॥ शंकरभीमरथातेंबोलत ॥
तूंक्षत्रियअससीपराक्रमयुक्त ॥ कायइच्छाअसेतुझेमनांत ॥ निवेदनकरींसत्वरी
॥५७॥ तूंस्तवनकेलेंसिअपार ॥ मजसीसंतोषझालाथोर ॥प्रसन्नअसेंमीपिनाक
धर ॥ वरमागजोइच्छिशी ॥ ५८ ॥ तूंमागसीजेवस्त ॥ देवांजरीदुरापांस्त[1] ॥
तथापितुजसींदेईनसमस्त ॥ संशयनधरींमानसीं ॥ ५९ ॥ येणेंपरिबोलतांशंक
र ॥ भीमरथआनंदेंनिर्भर ॥ प्रेमेंकरूनिनमस्कार ॥ वरमागेतोऐका ॥ ६० ॥ ज
रीप्रसन्नझालासीशंकरा ॥ तरीमातेंदेईऐशावरा ॥ जगउद्धारार्थतवांगींच्यानीरा[2]
॥ भूमीवरीनेऊंशकें[3] ॥ ६१ ॥ माझाव्हावाउद्धार ॥ जगहीउद्धरोचराचरें[4] ॥ तु
जसीअसोनमस्कार ॥ परमात्म्यापरमेश्वरा ॥ ६२ ॥ विधीसांगेनारदाकारणें
ऐसेंयाचितांभीमरथानें ॥ तीर्थदिधलेंशंकरानें ॥ प्रसन्नवदनहोऊन ॥ ६३ ॥ ती
र्थमिळतांभीमरथ ॥ मुखेंशिवनामजपत ॥ त्यापर्वतशिखरींस्थापित ॥ भीमाना
मठेवीतया ॥ ६४ ॥ भीमदेहापासूनिउत्पत्ती ॥ भीमरथेंस्थापिलीक्षिती ॥ भीमा
नामठेविलेंतिजप्रती ॥ सूतसांगेशौनकादिकां ॥ ६५ ॥ भीमरथकरीस्तोत्र[5] ॥ भी



१ मिळण्यालाकठीण. २ उदका. ३ नेण्याचेंमलासामर्थ्यद्यावें. ४ मनुष्य,पशुइत्यादिक ( चर ). वृक्ष, पाषाणइत्यादिक ( अचर ). ५ स्तुती.

मेतुझामाहिमाअपार ॥ सहस्त्रमुखशेषसाचार ॥ तवमहिमावर्णूनशके ॥ ६६ ॥
मातेअसेंमीपापमती ॥ माझ्याघातकानसेमिती ॥ मजसद्यावींउत्तमगती ॥
बालकअसेंमीतुझा ॥ ६७ ॥ सूतह्मणेशौनकादिकांतें ॥ भीमरथेंस्थापिलेंभीमेतें
॥ तत्तीरवासिजनांच्यापुण्यातें ॥ मितीनाहींपरियेसा ॥ ६८ ॥ सर्वतीर्थीभीमा
श्रेष्ठ ॥ खलजनहीस्नानमात्रेंवरिष्ठ ॥ होतीतिचामहिमाकष्ट ॥ वर्णनकरितांन
सोंपेची ॥ ६९ ॥ शौनकादिकांसूतसांगत ॥ विधीनेंसांगीतलीनारदाप्रत ॥ ती
चकथामीयथार्थ ॥ तुह्मांप्रतीनिवेदिली ॥ ७० ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ ह्याच
रित्राचेंलेखन ॥ तैसेंचदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ७१ ॥ इतिश्रीपद्मपु
राणेउत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रेसूतकथितकथाकल्पतरौ भीमावतारवर्णनंना
म चतुर्थाध्यायगोडहा ॥ ७२ ॥ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ २९५ ॥

---

१ पापबुद्धि.



श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ ॐनमोजीदाक्षायणी
वरा ॥ जगन्नियंत्याउदारा ॥ अगम्यगुणसागरा ॥ वर्णनींअशक्यतुझामहिमा॥
॥ १ ॥ तुझेंनकळेमूळमध्यअवसान ॥ जेथेंथकलेब्रह्माआणिरमारमण ॥ ऐशातु
झ्यामहिम्याकारण ॥ वर्णनकोणकरूंशके ॥ २ ॥ सूतसांगेशौनकादिकांप्रती ॥
मागीलअध्यायाचेअंतीं ॥ भीमावतारकथिलानिश्चिती॥पुढेंचरित्रपरिसाहो ॥३॥
नारदविनवीपरमेष्ठींसी ॥ भीमेंभीमाआणिलीभूमीसी ॥ स्थापूनियांगिरिशिख
रासी ॥ पुढेंकायकरिताझाला ॥ ४ ॥ विधिह्मणेनारदातें ॥ भीमाआणिल्यावरी
क्षितीतें ॥ भीमेंस्नानकेलेंपापनिष्कृतीतें ॥ जाताझालास्वनगरीं ॥ ५ ॥ अयोध्ये
प्रतीजाऊन ॥ पुत्रासीराज्यींस्थापून ॥ पुनरपीभीमातीरींयेऊन ॥ तपमांडिलेंदु
ष्कर ॥ ६ ॥ येणेंपरीतपकेलें ॥ कालांतरेंदेहावसानझालें ॥ शिवदूतींकैलासींने
लें ॥ भीमरथातेंसत्वरी ॥ ७ ॥ नारदह्मणेब्रह्मदेवासी ॥ श्रवणकेलेंभीमावतारा
सी ॥ तथापिइच्छाअसेमानसीं ॥ आणखीचरित्रश्रवणकरावें ॥ ८ ॥ भीमेंआणि
ल्याभीमेचें॥ पुढेंवर्तल्याचरित्राचें ॥ कथनकरावेंमजप्रतिसाचें ॥ प्रेमयुक्तहोऊनि
यां ॥ ९ ॥ अनुक्रमेंकरूनिभीमाचरित ॥ इतिहासासहसांगामजप्रत ॥ नारदवि
नवीब्रह्मदेवाप्रत ॥ वारंवारपरियेसा ॥ १० ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदा ॥ ह्मणसीसं

१ दक्षप्रजापतीचीकन्या. २ ब्रह्मदेव. ३ब्रह्महत्येचेंपाप नष्टहोण्याकरितां. ४मृत्युप्राप्तझाला.

 पूर्णभीमाचरित्रवदा ॥ सविस्तरकथनींममबुद्धिमंदा ॥ तूंहीश्रवणींअसमर्थ॥ ११॥ 
तथापिथोडेंसांगेन ॥ नारदाऐकेंभक्तीकरून ॥ जींप्रसिद्धतीर्थेंअसतीजाण ॥ वे
 दवंद्यअसतीतीं ॥ १२ ॥ तींसांगतोंसंक्षेपेंकरून ॥ वामदेवासीनमस्कारून ॥ जे 
थेंअसेशिवस्थान ॥ प्रत्यक्षभीमाशंकरतो ॥ १३ ॥ जयाभीमाशंकरास्मरतां॥ना
शहोयपापशतां ॥ कैलासासमानअसेतत्वतां ॥ मंदरशिखरींजेणेंपरी ॥ १४ ॥
शंकरवसेसदासर्वदा ॥ तैसाचभीमाचलींसदा ॥ इंदुयोगेंशोभेमूर्द्धा ॥ तयाशींमा
झानमस्कार ॥ १५ ॥ तत्तेजेंतमेंनष्टहोई ॥ तत्समचंद्रसूर्यहीनाहीं ॥ पापनाशक
रण्यापाहीं ॥ अन्यतीर्थेंमाघारती ॥ १६ ॥ भीमाशंकरयानामेंकरून ॥ भीमाशं
करींवसेजाण ॥ इंद्रादितेहेतीसकोटीदेवगण ॥ वसतीयेऊनिभीमाचलीं ॥१७॥
ब्रह्माविष्णुहीसेवेसी ॥ येऊनिराहतीभीमाशंकरासी ॥ वसिष्ठादिब्रह्मर्षि ॥ तपक
रावयायेतीतेथें ॥ १८ ॥ भीमाशंकराचेसमीप ॥ इंद्रादिदेवकरितीतप ॥ तयाचे
स्मरणेंआपेंआप ॥ पूर्वार्जितहीपापेंजाती ॥ १९ ॥ मरीचिनारदअत्रिऋषी ॥ द
क्षादिमुनीमहातापसी ॥ येवोनिसेवितीभीमेश्वरासी ॥ऐसेंस्थानपुण्यपावन॥२०॥
सनकादिकमहात्मे ॥ कालक्रमितीभीमेश्वरनामें ॥ तेथेंमानवकायकामें॥अत्यंत 
राहीलसेवितां ॥ २१ ॥ तैसेचिसाध्यवल्कलांबरधारी ॥ दंडीव्रतीब्रह्मचारी॥स्ना

१ संपूर्णचरित्रकथनकरण्यालामीसमर्थनाहीं. २ शंकर. ३ मस्तक. ४ अंधकार. ५ पूर्वजन्मीं संपादन केलेलीं.

तकादिस्थिरचरीं ॥ वसणारआलेतयेस्थानीं ॥ २२ ॥ सर्वींमांडिलेंउग्रतपास ॥ अस्थिमात्रराहिल्याशेष ॥ संपूर्णदग्धजाहलेंकिल्बिष ॥ भावेंसेवितीशंकरा ॥ २३ ॥ वैसेचिदेवगंधर्वपितर ॥ सिद्धचारणविद्याधर ॥ किंपुरुषगुह्यक किन्नर ॥ खगनागआलेतेथें ॥ २४ ॥ पिशाचादिभूतगण ॥ वेताळतयां चाराजाजाण ॥ नानाविभवसंपन्न ॥ वहनभूषणासहआलेतेथें ॥ २५ ॥ भीमाशं करनामेंगर्जती ॥ तयाचामहिमासदावर्णिती ॥ मानसींअत्युल्हासमानिती ॥ हेतूपूर्णझालेत्यांचे ॥ २६ ॥ जेजेसेवितीभीमाशंकरा ॥ तयांच्याहोतपापसंहा रा ॥ मुखेंवदावेंहेशंकरा ॥ भक्तिआमुचीदृढअसो ॥ २७ ॥ पृथ्वीवरीडाकिनीस मान॥अन्यक्षेत्रनाहींजाण॥स्मरतांहोयपापमोचन॥तरीस्नानमहिमावर्णूकिती ॥ ॥ २८ ॥ जेकोणीवधितीआपुलींपितरें ॥ स्नानमात्रेंपापसरे ॥ निश्चयपाहिजेत रीचतरे ॥ भवसागरामाजीतो ॥ २९ ॥ सर्वभूतींजेद्रोहकरिती ॥ सद्गुणहीनमंद मती ॥ सदावसेज्याविषयींप्रीती ॥ पापीअसतीदुरात्मेते ॥ ३० ॥ ऐसेदुर्धरपा तकीअसती॥अनुतापेंडाकिनीतीर्थींयेती ॥ तरीत्यांतात्काळहोईलगती ॥ भक्तिअ चलअसावी ॥ ३१ ॥ जेदुर्वृत्तदुराचारी ॥ दुःशीलकृपणनिर्धारी ॥ लुब्धकक्रोधी परदारीं ॥ मनवसेजयांचें ॥ ३२ ॥ ऐसेहीमहत्पापीजाण ॥ डाकिनीतीर्थींकरिती

---

१ ऐश्वर्य. २ उत्साह. ३ पश्चात्तापयुक्तहोऊन. ४ मुक्ति. ५ महालोभी.

स्नान ॥ दानकरितांपापसंपूर्ण ॥ नष्टहोईसर्वांचें ॥ ३३ ॥ तयाभीमाशंकरासी ॥
भीमावसेपश्चिमदिशीं ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ ऐसेंस्थानपावनअसे ॥ ३४ ॥
तयातीर्थाचियेठायीं ॥ उपवासादिकरावेंपाहीं ॥ क्षौरश्राद्धादिपरमस्नेहीं ॥ पित
रतृप्त्यर्थकरावें ॥ ३५ ॥ भक्तीनेंकरितांपिंडदान ॥ निश्चयेंकरावेंभीमास्नान ॥
तैसेंचिभीमाशंकरदर्शन ॥ शिवलोकप्राप्तहोई ॥ ३६ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी
॥ ब्रह्मदेवेंसांगीतलीनारदासी ॥ तीचकथामींतुह्मांसी ॥ यथामतिनिवेदिली॥३७
रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्य
असो ॥ ३८ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितक
थाकल्पतरौ भीमामहिमवर्णनंनामपंचमाध्यायगोडहा ॥ ५ ॥ ॥
॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ ३३३ ॥ ॥ ॥



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ ॐनमोजीभाललोचना ॥ हिमजामातापार्वतीरमणा ॥ पापनाशकादक्षयज्ञमथना ॥ त्रिपुरदाहकावृषभध्वजा ॥ १ ॥ दाक्षायणीवराभक्ततारका ॥ सर्पभूषणाभूतपालका ॥ भक्तरक्षकाप्रलयकारका ॥ स्मशानवासियाभवानीपते ॥ २ ॥ सूतह्मणेशौनकादिकांप्रती ॥ ज्यांचीशिवस्मरणींवसेप्रीती ॥ येचविषयींकथानिगुती ॥ सांगतोंतुह्मांविस्तारें ॥ ३ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ भीमामाहात्म्यश्रवणकारिसी ॥ भीमाजलाभिषेकहोतांनरासी ॥ शिवलोकप्राप्तीहोतसे ॥४॥ येचविषयींकथापुरातन॥सांगतोंमीतुजकारण ॥ निश्चलत्वेंकरींश्रवण ॥ दृढभक्तिअसोंदे ॥ ५ ॥ पूर्वींमागधपुरीचेठाईं ॥ महाक्षत्रियसोमान्वयीं ॥ सदावेश्येसींरतहोई ॥ पापीअसेदुरात्मा ॥ ६ ॥ मांसआहारकरीसदा ॥ मद्याशनींप्रीतीबुद्धिमंदा ॥ साधूजनांचीसंपदा॥ हरणकरीप्रयत्नें ॥ ७ ॥ परस्त्रियेशींसदारममाण ॥ कामीअसेपरमस्त्रैणं ॥ लुब्धकचंडकोपिष्ठजाण ॥ पार्थिवअसेजाणपां ॥ ८ ॥ साधुसांगतीराजासिनीती ॥ तयावाटेव्यर्थबडबडती ॥ धर्माविषयींवसेअप्रीती ॥ ऐसापापीदुरात्मा ॥९॥ शिवनिंदाकरीसतत ॥ शिवभक्तांसिद्वेषित ॥ शिवकोणकोणीपाहिलाह्मणत ॥ कोणशिवकीर्तनकरीतसे ॥ १० ॥ राजाअसेदैवेंमोहित ॥ येणेंपरीशिवासिनिंदित ॥

१ हिमालय पर्वत. २ संहार. ३ मद्यप्राशनकरण्याविषयीं. ४ स्त्रीलंपट. ५ राजा.

जेशिवासीनित्यभजत ॥ तयांसीताडनकरीतसे ॥ ११ ॥ ब्राह्मणहेअसतीकोण ॥
वेदआलेकोठून ॥ वैदिककर्मव्रतपूर्ण ॥ सर्वहीव्यर्थअसेची ॥ १२ ॥ पोटभरावया
॥ १ ॥ नमिळेअन्न ॥ ह्मणोनिसांगतीद्यावेंदान ॥ येणेंपरीपाखंडज्ञान ॥ पूर्णवसेतयामा ॥ ६ ॥
जी ॥१३॥ अनीतीनेंनित्यवर्तत ॥ प्रजेसीउग्रदंडकरित ॥ येणेंपरीप्रजासमस्त ॥
त्रासयुक्तहोतसे ॥ १४ ॥ सूतह्मणेशौनकादिऋषींतें ॥ नीतीनशिकवीप्रजाजना
तें ॥ प्रत्यक्षकालचीसर्वांतें ॥ भासेराजासदातो ॥ १५ ॥ येणेंपरीकितीएककाला ॥
जातांराजापंचत्वपावला ॥ यमदूतींयमलोकींनेला ॥ घातलापिशाचयोनींत ॥
॥ १६ ॥ मनुष्याहूनीदशगुण ॥ देहझालालंबायमान ॥ हस्तपादहितैसेचिजा
ण ॥ दीर्घअसतीतयाचे ॥ १७ ॥ नेत्रअसतीविशाळजाण ॥ मुखाबाहेरदंतनिघू
न ॥ हस्तपरिमितआलेजाण ॥ ऐसेंस्वरूपबिकटअसे ॥ १८ ॥ उदरअसेजेवीं
गर्त ॥ मलिनअसेदुर्गंधयुक्त ॥ येणेंपरीपिशाचभ्रमत ॥ तयावनामाझारी ॥१९॥
मस्तककुंभाएवढेंअसे ॥ दाहीदिशेंमाजीभ्रमतसे ॥ दुःखेंविव्हलहोतसे ॥ मनामा
जीअत्यंत ॥ २० ॥ शतर्चनऋषींचेआश्रमापाशीं ॥ वटवृक्षहोताबहुतदिवशीं ॥
तयावृक्षाचेशिखरासी ॥ नित्यवासकरीतो ॥ २१ ॥ हाहादैवामेलोंमेलों ॥ पूर्वा ॥ १ ॥
र्जितपापेंपोळलों ॥ पिशाचयोनीमाजीपातलों ॥ दैवगतीविचित्रही ॥ २२ ॥

१ नास्तिक. २ मृत्यु पावला. ३ पिशाचजन्म ४ मोठी खांच. ५ शतर्चन यानांवाचा ऋषि.

येणेंपरीमहाशब्द ॥ करीतसेअब्दोअब्द ॥ जेंवीहोतसेमेघनाद ॥ रुदनकरीये
णेंपरी ॥ २३ ॥ शतर्चनऋषींनींएकेकाळीं ॥ रुदनध्वनीश्रवणकेली ॥ मगयेऊ
नियांवृक्षाखालीं ॥ पिशाचदृष्टींअवलोकिला ॥ २४ ॥ तयापिशाचाप्रतीजाण ॥
ऋषीविचारीरुदनदारुण ॥ करितोसिकायकारण ॥ तेंमजप्रतीनिवेदावें ॥ २५ ॥
ऋषीह्मणेहेपिशाचपते ॥ दुःखकारणजाहलेंकायतें ॥ सर्वहीकथनकरींमातें ॥ संशय
नधरींमानसीं ॥२६॥ ऐसेंऋषीचेंभाषण ॥ पिशाचेंकरूनियांश्रवण ॥ ऋषीसंन्नि
धानींयेऊन ॥ सविस्तरवृत्तसांगे ॥ २७ ॥ पिशाचह्मणेऋषिवर्या ॥ ब्राह्मणद्वेषके
लाम्यां ॥ साधुजनांसीपीडादेऊनियां ॥ आनंदेंराज्यकरीतहोतों ॥ २८ ॥ शिव
निंदामीनित्यकरीत ॥ वेदांसीसदाधिक्कारीत ॥ साधुजनांसिनसेंप्रणत ॥ ह्मणो
निदशाहीपावलों ॥ २९ ॥ नरकयातनाभोगिल्याबहुत ॥ कुंभिपाकींघालितीदू
त ॥ तेथूनियांपिशाचयोनींत ॥ जन्मपावलोंपूर्वकर्मी ॥ ३० ॥ आतांप्रारब्धवशें
करून ॥ मजसीजाहलेंतुमचेंदर्शन ॥ येथूनिआतांकरासोडवण ॥ अन्यत्रांतानसे
ची ॥ ३१ ॥ तुमच्यादर्शनेंगेलेंदुःख ॥ ह्मणोनिवाटेमनींहरिख ॥ साधुदर्शनेंहो
ईलसुख ॥ ऐसानिश्चयमाझाझाला ॥ ३२ ॥ शतर्चनह्मणेपिशाचाप्रती ॥ मेषरा
शीसियेईलदिनपती ॥ भीमाशंकरींजाईनिश्चिती ॥ दुःखमुक्तहोशीलतूं ॥३३ ॥

१ भयंकर. २ नवल. ३ हें नांव ४ रक्षणकरिता. ५ सूर्य

तेथेंतूंकरितांस्नान ॥ जन्मांतरींचेंपापजाऊन ॥ अंतींशिवलोकाप्रतिजाशीलजा
ण ॥ असत्यनोहेकल्पांतीं ॥ ३४ ॥ तत्राप्लुतांदिवंयांति ॥ ऐसेंबोलेश्रुतिस्मृति ॥
॥२॥ भावदृढधरींनिश्चिती ॥ मुक्तहोशीलनिश्चयें ॥ ३५ ॥ पिशाचह्मणेऋषीप्रती ॥ ॥६॥
पुण्यक्षेत्रींनोहेपिशाचगती ॥ मगस्नानहोईलकोणेरीती ॥ हेंमजसीनिवेदावें ॥
॥३६ ॥ पिशाचह्मणेऋषीसी ॥ मजवरीकराउपकारासी ॥ दुष्टजनांवरीउपकारक
र्त्यासी ॥ साधुह्मणतीजगामाजी ॥ ३७ ॥ उपकारअवश्यकरावा ॥ धनआणि
प्राणहीखर्चावा ॥ उपकारींसंकोचनकरावा ॥ तयापुण्यापारनाहीं ॥ ३८ ॥ ऐसें
ऐकूनियांवचन ॥ दयायुक्तहोऊनिमन ॥ पिशाचासिसंगेंघेऊन ॥ भीमाशंकराप्र
तीपातला ॥ ३९ ॥ पिशाचासिवनींठेऊन ॥ ऋषीनेंकेलेंजाऊनस्नान ॥ संगेंउद
कआणून ॥ पिशाचासीदीधलें ॥ ४० ॥ पिशाचेंउदककरितांप्राशन ॥ प्रेतत्वत
यासिआलेंजाण ॥ पुनरपिऋषीकरीजलसेचन ॥ तयाप्रेतावरीजाणपां ॥४१ ॥
सूतह्मणेशौनकादिऋषींना ॥ कितीकरूंभीमावर्णना ॥ ऋषीनेंकरितांउदकसेच
ना ॥ दिव्यदेहतत्क्षणींजाहला ॥ ४२ ॥ ऐसापाहूनियांमहिमा ॥ देखोनिआपु
ल्यादेहाउत्तमा ॥ पिशाचह्मणेप्रत्यक्षब्रह्मा ॥ वर्णनकरूंनशकेल ॥ ४३ ॥ शंक ॥२॥
राचेशरीरापासून ॥ भीमाजाहलीउत्पन्न ॥ तियेचेंकरितांस्मरण ॥ पावनहोतोता

१ त्याठिकाणीं स्नान केलेले स्वर्गांमत जातात असें वेदशास्त्रांत लिहिलें आहे. २ गमन. ३ तीर्थप्राशन. ४ शिंपडणें.

त्काल ॥ ४४ ॥ तिळमात्रप्राशितांउदक ॥ देवचिहोईतात्काळिक ॥ जन्ममरणचु
कलेंदेख ॥ तयासभाग्यप्राणियाचें ॥ ४५ ॥ भीमाजलामाजीजाण ॥ जोक
रीप्रेमेंपितृतर्पण ॥ नरकस्थअसतीपितरगण ॥ तरीस्वर्गींजातीतात्काळिक॥४६
ब्रह्मदेवासमानहोती ॥ पुनरपिनसेमृत्युलोकप्राप्ती ॥ नरेंभीमास्नानकरितांनिगु
ती ॥ शिवपदप्राप्तीहोईतयां ॥ ४७ ॥ भीमेसमाननदीनाहीं ॥ सर्वांमाजीश्रेष्ठ
असेही ॥ शतर्चनऋषीनेंपिशाचासही ॥ गतीदेऊनआश्रमींगेला ॥ ४८ ॥ सूत
ह्मणेशौनकादिकांसी ॥ येणेंपरीपिशाचासी ॥ गतीजाहलीपरियेसीं ॥ शिवलो
कासिदूतींनेला ॥ ४९ ॥ जोकोणिहीपुण्यदाकथा ॥ श्रवणकरीलभावेंतत्वता ॥
त्यासीनबाधीभवव्यथा ॥ वाचनकरितांतैसेंची ॥ ५० ॥ जयाचीअसेयेथेंभक्ती ॥
त्यासीतात्काळहोईमुक्ती ॥ घेऊनियांसंगेंपदातीं ॥ स्वर्गींजातीनृपवर ॥ ५१ ॥
रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअ
सो ॥ ५२ ॥ ॥ इतिश्रीपद्मपुराणेउत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रेसूतकथितक
थाकल्पतरौभीमामहिमावर्णनंपिशाचमोक्षणंनाम षष्ठाध्यायगोऽहा ॥ ६ ॥ ॥
॥ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ ३८५ ॥ ॥ ॥

१ पुण्यदेणारी. २ संसारपीडा. ३ सैन्य.

तेथेंतूंकरितांस्नान ॥ जन्मांतरींचेंपापजाऊन ॥ अंतींशिवलोकाप्रतिजाशीलजा
ण ॥ असत्यनोहेकल्पांतीं ॥ ३४ ॥ तत्राप्लुतांदिवंयांति ॥ ऐसेंबोलेश्रुतिस्मृति ॥
भावदृढधरींनिश्चिती ॥ मुक्तहोशीलनिश्चयें ॥ ३५ ॥ पिशाचह्मणेऋषीप्रती ॥
पुण्यक्षेत्रींनोहेपिशाचगती ॥ मगस्नानहोईलकोणेरीती ॥ हेंमजसीनिवेदावें ॥
॥३६ ॥ पिशाचह्मणेऋषीसी ॥ मजवरीकराउपकारासी ॥ दुष्टजनांवरीउपकारक
र्त्यासी ॥ साधुह्मणतीजगामाजी ॥ ३७ ॥ उपकारअवश्यकरावा ॥ धनआणि
प्राणहींखर्चावा ॥ उपकारींसंकोचनकरावा ॥ तयापुण्यापारनाहीं ॥ ३८ ॥ ऐसें
ऐकूनियांवचन ॥ दयायुक्तहोऊनिमन ॥ पिशाचासिसंगेंघेऊन ॥ भीमाशंकराप्र
तीपातला ॥ ३९ ॥ पिशाचासिवनींठेऊन ॥ ऋषीनेंकेलेंजाऊनस्नान ॥ संगेंउद
कआणून ॥ पिशाचासीदीधलें ॥ ४० ॥ पिशाचेंउदककरितांप्राशन ॥ प्रेतत्वत
यासिआलेंजाण ॥ पुनरपिऋषीकरीजलसेचन ॥ तयाप्रेतावरीजाणपां ॥४१ ॥
सूतह्मणेशौनकादिऋषींना ॥ कितीकरूंभीमावर्णना ॥ ऋषीनेंकरितांउदकसेच
ना ॥ दिव्यदेहतत्क्षणींजाहला ॥ ४२ ॥ ऐसापाहूनियांमहिमा ॥ देखोनिआपु
ल्यादेहाउत्तमा ॥ पिशाचह्मणेप्रत्यक्षब्रह्मा ॥ वर्णनकरूंनशकेल ॥ ४३ ॥ शंक
राचेशरीरापासून ॥ भीमाजाहलीउत्पन्न ॥ तियेचेंकरितांस्मरण ॥ पावनहोतोता

१ त्याठिकाणीं स्नान केलेले स्वर्गामत जातात असें वेदशास्त्रांत लिहिलें आहे. २ गमन. ३ तीर्थप्राशन. ४ शिंपडणें.

त्काल ॥ ४४ ॥ तिळमात्रप्राशितांउदक ॥ देवचिहोईतात्काळिक ॥ जन्ममरणचु
कलेंदेख ॥ तयासभाग्यप्राणियाचें ॥ ४५ ॥ भीमाजलामाजीजाण ॥ जोक
रीप्रेमेंपितृतर्पण ॥ नरकस्थअसतीपितरगण ॥ तरीस्वर्गींजातीतात्काळिक॥४६
ब्रह्मदेवासमानहोती ॥ पुनरपिनसेमृत्युलोकप्राप्ती ॥ नरेंभीमास्नानकरितांनिगु
ती ॥ शिवपदप्राप्तीहोईतयां ॥ ४७ ॥ भीमेसमाननदीनाहीं ॥ सर्वांमाजीश्रेष्ठ
असेही ॥ शतर्चनऋषीनेंपिशाचासही ॥ गतीदेऊनआश्रमींगेला ॥ ४८ ॥ सूत
ह्मणेशौनकादिकांसी ॥ येणेंपरीपिशाचासी ॥ गतीजाहलीपरियेसीं ॥ शिवलो
कासिदूतींनेला ॥ ४९ ॥ जोकोणीहीपुण्यदाकथा ॥ श्रवणकरीलभावेंतत्वता ॥
त्यासीनबाधीभवव्यथा ॥ वाचनकरितांतैसेंची ॥ ५० ॥ जयाचीअसेयेथेंभक्ती ॥
त्यासीतात्काळहोईमुक्ती ॥ घेऊनियांसंगेंपदातीं ॥ स्वर्गींजातीनृपवर ॥ ५१ ॥
रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअ
सो ॥ ५२ ॥ ॥ इतिश्रीपद्मपुराणेउत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रेसूतकथितक
थाकल्पतरौभीमामहिमावर्णनंपिशाचमोक्षणंनाम षष्ठाध्यायगोडहा ॥ ६ ॥ ॥
॥ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ ३८५ ॥ ॥ ॥

१ पुण्यदेणारी. २ संसारपीडा. ३ सैन्य.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीभीमाशंकरायन
मः ॥ ॐनमोजीमदनांतकामनमोहना ॥ मदमत्सरकाननदहना ॥ हेभवभयपा
शनिकृंतना[1] ॥ भवानीरंजनाभयहारका ॥ १ ॥ हिमाद्रिजामातागंगाधरा ॥ सिं
दुराननजनकाकर्पूरगौरा ॥ पद्मनाभमनरंजनात्रिपुरहरा ॥ त्रिदोषशमनात्रिपु
रेशा ॥ २ ॥ नीलग्रीवासुहास्यवदना ॥ अंधकमर्दना[2]नंदिवहना ॥ गजांतकादक्ष
क्रतुदलना ॥ दानवमर्दनादयानिधे ॥ ३ ॥ अनंतभक्तप्रियकरा ॥ रावणांतकपू[3]
ज्यात्रितापहरा ॥ तुझामहिमावर्णावयादशशतवक्रा ॥ शक्तीनोहेचीसर्वथा ॥४॥
जेजेमनींधरोनीहेत ॥ तुजस्वामीअनन्यभावेंभजत ॥ त्यांतेंपुरविशीइच्छितपदा
र्थ ॥ कृपायुक्तहोऊनियां ॥ ५ ॥ नित्यशांतानिर्विकल्पानिरंजन ॥ आशाबंधरहि
तविरक्तपूर्ण ॥ निजभक्तपाशविमोचन ॥ जन्ममरणमोचकतूं[4] ॥ ६ ॥ मागलिअ
ध्यायाचेअंतीं ॥ महापापीपृथ्वीपती॥शरणयेवोनिशतचंनऋषीप्रती ॥ भीमाती
र्थीउद्धरला ॥ ७ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ कथाश्रवणकरींप्रेमेंसी ॥ भीमाशं
कराचेपश्चिमदिशीं ॥ डाकिनीक्षेत्रप्रसिद्धअसे ॥ ८ ॥ डाकिनीक्षेत्रअसेश्रेष्ठ ॥ स
र्वहीक्षेत्रांमाजीवरिष्ठ॥महिमावर्णावयास्पष्ट ॥ समर्थकोणीहीअसेना ॥९॥ तया
च्यादर्शनमात्रेंकरून ॥ मानवहोईपावन ॥ भक्तियुक्तअंतःकरण ॥ तात्काळिक

१ नाशकरणाऱ्या. २ अंधकनांवाचा दैत्य. ३ रामाची पूजा करणारा. ४ सोडविणारा.

होतसे ॥ १० ॥ नारदह्मणेपितामहासी ॥ भीमाशंकराचेपार्श्वमेसी ॥ डाकिनी
क्षेत्रींदेवताकैसी ॥ कोणतीउत्पन्नजाहली ॥ ११ ॥ ब्रह्मदेवह्मणेतयातें ॥ शंकरें
 वधिलेंत्रिपुरासुरांतें ॥ दाहजाहलाशरीरातें ॥ बहुतकालपर्यंत ॥ १२ ॥ त्यादा 
हाचेयोगेंकरून ॥ उत्पन्नजाहल्यादेवताजाण ॥ प्रसिद्धडाकिनीऐशानामान ॥
भीमाशंकरींअसत्याझाल्या ॥ १३ ॥ तयांचींनांवेंतुजकारण ॥ सांगतोंदेवऋषे
करींश्रवण॥त्रिपुरात्रिजगन्माताजाण॥भीमात्रिपुरभैरवी॥१४॥भानंदाआणिको
टराक्षी ॥ विद्युज्जिव्हाशर्वरीमहीसी ॥ जयाजयंतीविजयाहीपरियेसीं ॥ डाकिनी
पराजिताप्रसिद्धअसती ॥ १५ ॥ हींअसतीतयांचींनामें ॥ नारदासांगीतलींतुज
सीप्रेमें ॥ यांचीउपासनाकरितांनेमें ॥ सर्वहेतुपूर्णहोती ॥ १६ ॥ अष्टमीआणि
चतुर्दशीसी ॥ विशेषेंकरूनभौमवारेंसी ॥ तयांच्याकरितांपूजनासी ॥ भवतापा
सीनष्टकरिती ॥ १७ ॥ नारदह्मणेब्रह्मदेवातें ॥ यांच्यासेवनेंमुक्तीतें ॥ कोणगे
लात्याच्याइतिहासातें ॥ मजकारणेंनिवेदा ॥ १८ ॥ ऐसेंऐकोनिनारदवचन ॥ब्र
ह्मदेवह्मणेत्याकारण ॥ सांगतोंऐकेंचित्तदेऊन ॥ पूर्वीलइतिहासतुजलागीं॥१९॥
भवतस्यनामकऋषीचा ॥ जैमिनस्यनामेंपुत्रसाचा ॥ तयासीकुटुंबभरणाचा ॥
भारपडिलाअंगावरी ॥ २० ॥ कुटुंबभरणाविचारकरी ॥ हिंडतसेदारोदारीं ॥ 

१ सेवा. २ मंगळवारीं. ३ पोषण.

याचनाकरीनानापरी ॥ तथापीकांहींनमिळेची ॥ २१ ॥ येणेंपरीकरीकष्ट ॥ आ
शापाशजाळितीदुष्ट ॥ ह्मणोनियांतोद्विजश्रेष्ठ ॥ दुःखकरीअत्यंत ॥ २२ ॥ आपु
ल्याग्रामातेंसोडून ॥ देशोदेशींकरीभ्रमण ॥ तथापीकांहींनमिळेधन ॥ तयाब्रा
ह्मणाकारणें ॥२३॥ ह्मणोनियांवैराग्ययुक्त ॥ जाहलेंअसेत्याचेंचित्त ॥ विमुखजा
हलाअत्यंत ॥ धनहीनत्वेंकरूनियां ॥ २४ ॥ जेजेअसतीज्ञानीजन ॥ तयांजव
ळीनसतांधन ॥ तयांसीवैराग्यावांचून ॥ अन्यसाधननसेची ॥ २५ ॥ ऐसा
कितीएककालक्रमितां ॥ वृत्तीनेंहोयउदरभरिता ॥ तथापीनोहेकुटुंबपूर्णता ॥
ह्मणोनीवैराग्यधरियेलें ॥ २६ ॥ तोविप्रह्मणेतृष्णेसी ॥ कष्टेंहनिामिळेधनासी ॥
ऐसेंअसोनिमजसी ॥ दुःखदेसीकांपुनःपुनः ॥ २७ ॥ ह्मणोनीतृष्णेतुजसीआ
तां ॥ सांगतोंश्रवणकरींतत्वतां ॥ तुझियेचरणींअसोमाथा ॥ पुनर्दर्शननकोतुझें
॥ २८ ॥ येणेंप्रकारेंकरूनीविचार ॥ वसिष्ठाजवळीजावोनिसत्वर ॥ तयातेंकरू
नीनमस्कार ॥ आपुलेंसविस्तरवृत्तसांगे ॥ २९ ॥ कामादिकषड्रिपूंनीं ॥ मजसी
जाचिलेंअसेहोमुनी ॥ कष्टतसेंमीयाकारणीं ॥ मुक्तकरावेंयांतूनी ॥ ३० ॥ ऐशि
याऐकोनीविप्रवचनाला ॥ वसिष्ठऋषीअंतरींद्रवला ॥ तयातेंवचनबोलिला ॥

---

१ अपमानित. ( तेजहीन ) २ शेतकीकरून. ३ आशेला. ४ दुसऱ्याअध्यायांतीलदोषयाशब्दावरचीनोटपहा.
५ दयायुक्तझाला.

 कृपायुक्तहोऊनियां ॥ ३१ ॥ तयाविप्रासीवसिष्ठऋषी ॥ ह्मणेजाईंभीमाशंकरा 
सी ॥ तेथेंडाकिनीदेवतांसी ॥ पूजाकरींभक्तियुक्त ॥ ३२ ॥ तयांचेंभक्तीनेंकरितां
 पूजन ॥ तुझेंतुटेलभवबंधन ॥ यावचनींविश्वासठेऊन ॥ आचरणकरींयेणेंपरी ॥ 
॥ ३३ ॥ ऐसेंएकोनियांवचन ॥ जैमिनस्यभीमाशंकरींजावोन ॥ भीमाकुंडींस्ना
नकरोन ॥ डाकिनीसीपूजिताझाला ॥ ३४ ॥ प्रसन्नहोऊनियांडाकिनी ॥ वरमा
गह्मणतीत्यालागुनी ॥ ज्ञानाचियाखड्[१]गेंकरूनी ॥ अज्ञानछेदूनिटाकावें ॥ ३५ ॥
जैमिनस्यह्मणेतयांतें ॥ मजसीद्याहोऐशावरातें ॥ नाशनव्हावेंसंसारदुःखातें ॥
आशीर्वादद्यावाऐसा ॥ ३६ ॥ तथास्तुह्मणोनीडाकिनी ॥ अदृश्यजाहल्यातत्क्ष
णीं ॥ तात्काळजाहलामहाज्ञानी ॥ जगामाजीश्रेष्ठऐसा ॥ ३७ ॥ ज्ञानाच्याप्रभा
वेंकरून ॥ दुष्टसंगतीछेदून ॥ शांतजाहलाब्राह्मण ॥ व्यासवाल्मिकांसारिखा ॥
॥ ३८ ॥ येणेंप्रकारेंकरून ॥ ज्ञानीहोतांतोब्राह्मण ॥ संसारबंधनतुटोन ॥ मुक्त
जाहलातत्क्षणीं ॥ ३९ ॥ तेदिवसापासोनिजाण ॥ प्रसिद्धजाहलेंडाकिनीस्थान
॥ तयाच्यादर्शनमात्रेंकरून ॥ पुनीतहोतीसर्वही ॥ ४० ॥ डाकिनीचीजोस्तुं[२]ती
करी ॥ डाकिनीतेंहृदयीं[३]धरी ॥ अथवाडाकिनीक्षेत्रींतपकरी ॥ तयासमपुण्यदुजें 
नसे ॥ ४१ ॥ डाकिनीहींतीनअक्षरें ॥ जिव्हा[४]ग्रींवसतीज्याचियात्वरें ॥ तयासी

१ तलवार. २ स्तवनकरितो. ३ ध्यानकरी. ४ मुखांत.

मोक्षाचींद्वारें ॥ मुक्तअसतीसर्वदा ॥ ४२ ॥ डाकिनीमंत्राचाजोजपकरी ॥ अथ वाध्यानकरीअंतरीं ॥ तयातेंप्राप्तमुक्तीचारी ॥ असत्यनोहेकल्पांतीं ॥ ४३ ॥ हें डाकिनीचेंआख्यान ॥ जोकरीलभक्तियुक्तश्रवण ॥ अथवाप्रेमेंकरितांपठण ॥ पा पमुक्तहोईतो ॥ ४४ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ ब्रह्मदेवेंसांगीतलेंनारदासी ॥ डाकिनीच्याचरित्रासी ॥ तेंतुह्मांसीनिवेदिलें ॥ ४५ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ४६ ॥ इतिश्रीपद्म पुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ डाकिनीक्षेत्रम हिमावर्णनंजैमिनस्योद्धरणंनामसप्तमाध्यायगोडहा ॥ ७ ॥ ॥ ॥
॥ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ ४३१ ॥ ॥ ॥



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ ॐनमोजीविश्वव्याप
का ॥ उदाराभक्तवरदायका ॥ गिरिजारमणामदनांतका ॥ असुरमर्दनाविश्वेशा॥
॥१॥ शिवस्मरणनावडेअणुमात्र ॥ तोचांडाळाहूनिअपवित्र ॥ तयाचेशरीरींजेअलं
कार ॥ प्रेतजेंवीशृंगारिलें ॥ २ ॥ सूतह्मणेशौनकादिकांतें ॥ चरित्रमागीलअध्याया
तें ॥ छेदिलेंअसेजैमिनिस्यबंधनातें॥ पुढेंकथेतेंश्रवणकरा ॥३॥ भीमाशंकरासीवायव्ये
प्रती ॥ देवीअसेकमलजासती ॥ इयेसीपूजावेंप्रयत्नेंअती ॥ अखिलसंपत्तीप्राप्त
होय ॥ ४ ॥ तयेडाकिनीक्षेत्राचेठायीं ॥ पूजनायोग्यकमलजापाहीं ॥ पुष्पधूपदीपो
पहारांहीं ॥ पूजाकरावीमनोभावें ॥ ५ ॥ मणिमुक्तादिअलंकार ॥ अर्पणकरावींछत्र
चामर ॥ उत्तमभक्ष्यअसावेपरिकर ॥ वस्त्रेंअसावींपरिमलयुक्त ॥ ६ ॥ जेजेअस
तीलआपुलेकाम ॥ परिपूर्णव्हावेह्मणोनीनाम ॥ स्मरतअसावेंप्रतिदिननेम ॥ टळों
नद्यावाकार्यसिद्धी ॥ ७ ॥ आपुलेंकुठेंहीअसोवसतीस्थान ॥ जरीअल्पकेलेंअसेल
कमलजापूजन ॥ अनंतपटहोतसेजाण ॥ आपुलेमनोरथपूर्णहोती ॥ ८ ॥ मुख्य
पीठींकेलियाहोम ॥ नुरेअवशेषपापनाम ॥ तयाचापरिपाककैवल्यधाम ॥ प्राप्तहोत
सेनिर्धारें ॥ ९ ॥ भीमाकुंडींकरितांस्नान ॥ कमलजेचेंघेतांदर्शन ॥ नरनारीकोणी
हीजाण ॥ उत्तमस्थानतयांप्राप्त ॥ १० ॥ सूतह्मणेशौनकादिकांस ॥ येविषयींतुह्मां

१ जैमिनस्य मुक्त झाला. २ पुष्कळ. ३ थोडें. ४ स्थानीं. ५ शेवट.

लार्गींइतिहास ॥ विधीनेंजोसांगीतलानारदास ॥ सांगतोंतोश्रवणकरा ॥ ११ ॥ मा
धवनामेंएकविप्रऋषी ॥ वसतहोतातपोवनासी ॥ तपकरीतसेभावेंसीं ॥ सर्वशास्त्रज्ञ
असेतो ॥ १२ ॥ तयाऋषीनेंएकेकाळीं ॥ ऋषीअवलोकिलानभमंडळीं ॥ पडतहो
ताअधोमुखभूमंडळीं ॥ क्षीणपुण्यहोऊनियां ॥ १३ ॥ ऐशाऋषीतेंअवलोकून ॥ पु
सताझालापतनकारण ॥ तोह्मणेमजसीज्ञान ॥ नसेपतनकारणाचें ॥ १४ ॥ तोपुरुष
नम्रहोऊन ॥ माधवासीनमस्कारून ॥ ह्मणेजरीजाणतांपतनकारण ॥ मजकारणेंनि
वेदावें ॥ १५ ॥ माधवह्मणेविश्वावसूतें ॥ त्वांसमानकेलेंपापपुण्यातें ॥ यमदूतींनेलें
यमलोकातें ॥ उभेंकेलेंयमाजवळी ॥ १६ ॥ यमबोलिलातुजप्रती ॥ पापकींपुण्य
केलेंजगतीं ॥ त्वांसांगीतलेंयमाप्रती ॥ दोन्हीकेलींसमान ॥ १७ ॥ तयेकालींयम
बोलिला ॥ प्रथमभोगिसीपापाकींपुण्याला ॥ त्वांकथिलेंसीप्रथमपुण्याला ॥ भो
गूनिमगपापभोगीन ॥१८॥ यमेंतात्काळतुजलागीं ॥ पाठवूनीदिधलेंस्वर्गीं ॥ क्षी
णंपुण्यहोतांचिभूमीलागीं ॥ पाठवूनीदीधलें ॥ १९ ॥ पापभोगावयाकारणें ॥ मृ
त्युलोकींझालेंतुझेंयेणें ॥ विश्वावसुबोलिलामजकारणें ॥ कृतपापनिवेदावें ॥ २०॥
माधवबोलिलातयासी ॥ स्वर्गींभोगिलेंसुखासी ॥ आतांप्राप्तझालासीभूमीसी ॥ ॥ १ ॥
ह्मणसीपापनिवेदामज ॥ २१ ॥ पूर्वजन्माचियेठाईं ॥ तुवांपापजेंकेलेंसिपाहीं ॥ उ

१ खालीं मुखकरून. २ पतनपावलेल्यापुरुषाचें नांव. ३ पुण्यसरतांच.

च्यारकरण्याहीयोग्यनाहीं ॥ तथापिसांगतोंश्रवणकरीं ॥ २२ ॥ गाईअसेपरमपवि
त्र ॥ जीतेंवंदितीलोकसर्वत्र ॥ नर्मदाअसेजीचेमूत्र[1] ॥ वंद्यअसेत्रिलोकीं ॥ २३ ॥
मंगलदायकअसेधेनू ॥ जीच्याचरणींचेरेणू[2] ॥ स्पर्शहोतांपापअणू[3] ॥ उरोंनदेतीन
राचें ॥ २४ ॥ शृंगांचियाअग्रभागीं ॥ तीर्थेंवसतीसर्वचांगीं[4] ॥ स्पर्शहोतांलागवेगीं ॥
पापरहितकरिताती ॥ २५ ॥ खुराग्रींवसतीसर्वपर्वत ॥ दोनशिंगांचियेमध्यांत ॥
गौरीशंकरसाक्षात ॥ वासकरितीआनंदें ॥ २६ ॥ कोणीकेलियागोदान ॥ आनंद
तीपितरजाण ॥ नृत्यकरितीऋषिजन ॥ देवतांसहितविष्णुहर्षे ॥ २७ ॥ गाईअसे
लोकमाता ॥ तियेतेंप्रेमेंवंदितां ॥ प्रदक्षिणाभावेंकरितां ॥ पापनष्टहोयत्याचें ॥ २८ ॥
गोमय[5]असेसाक्षात्यमुना ॥ स्पर्शेंपापेंजळतीजाणा ॥ ऐशियाधेनूतेंपापसंपादना ॥
दंडेंताडणकेलेंसित्वां ॥ २९ ॥ जेंवीपवित्रगंगानीर ॥ तेंवीअसेगाईचेंक्षीर ॥ प्राशन
करितांपापसंहार ॥ क्षणमात्रेंहोतसे ॥ ३० ॥ गाईचियाअंगापाशीं ॥ भुवनेंवसती
चतुर्दशी ॥ ऐशियापवित्रगाईसी ॥ ताडणकेलेंसिविश्वावसू ॥ ३१ ॥ पदोपदींगाईसी
ताडण ॥ केलेंसिविप्राअज्ञानेंकरून ॥ त्यापापाचेंफलजाण ॥ भोगिसीआतांनिर्धा
रीं ॥ ३२ ॥ गाईचाग्रासकेलासीहरण ॥ गाईचीअवज्ञाकेलीसपूर्ण ॥ त्यादोषा
च्यायोगेंकरून ॥ स्वर्गच्युत[6]जाहलासी ॥ ३३ ॥ तुझियानामेंजरीकोणीं ॥ पिंड

१ गोमूत्र नर्मदेप्रमाणें पुण्यदायक आहे. २ धूळ. ३ थोडेंही. ४ उत्तम. ५ शेण. ६ स्वर्गापासून पतन पावलास.

देईलभीमास्थानीं ॥ त्वंदर्थभीमादर्शनीं ॥ स्वर्गतूतेंप्राप्तहोय ॥ ३४॥ विश्वावसूबोले
माधवासी ॥ अनुजीवीनामेंमत्पुत्रतापसी ॥ सुखेंनांदतोआश्रमासी ॥ सद्धर्माचरणीं
असे ॥ ३५॥ भीमातीर्थींचेंस्नान ॥ कमलजादेवीचेंदर्शन ॥ तोपिंडहीदेईलजाण॥
तथापीकैसेंकळेत्यासी ॥ ३६ ॥ यासीउपायकरावाकाय ॥ मजसीसांगाऋषिवर्य ॥
ह्मणोनीदुःखेंमोकलीधाय ॥ संतप्तजाहलामानसीं ॥३७॥ माधवबोलिलातयासी ॥
पूर्वींकेलेंसियज्ञयागासी ॥ तेणेंभोगिलेंस्वर्गासी ॥ तितुकेनपुण्यसंपलें ॥ ३८॥ गा
ईचीअवज्ञात्वांकेली ॥ जीपापाचीखाणवहिली ॥ तेणेंदुःखेंप्राप्तझाली ॥ विप्रातुज
सीअपार ॥ ३९ ॥ विश्वावसूबोलेतया ॥ सांगादुःखनाशनउपाया ॥ कोणमजभी
माशंकरठाया ॥ पिंडदेऊनिउद्धरील ॥ ४० ॥ मजसांगाहेंऋषिवर्या ॥ तुह्मींजाण
तांकर्मविपाकाया ॥ दुःखमुक्तहोऊहीकाया ॥ ऐसाकांहींउपायकरा ॥ ४१ ॥ मी
शरणआहेंतुह्मासी ॥ स्नाननकरितांभीमेसी॥नभेटतांकमलजेसी ॥ ऐशीगतीपावलों
॥ ४२॥ यामहासंसारघोरीं ॥ दुःखहोईनानाप्रकारीं॥भीमास्नानेंमुक्तीचारी ॥ प्राप्तहो
तीनिर्धारें ॥ ४३ ॥ भीमाशंकरींस्नाननकरितां ॥ कमलजेचेंदर्शननघेतां ॥ आक
स्मिकमृत्युप्राप्तहोतां ॥ स्वर्गींजातांपतनहोय ॥ ४४ ॥ भीमाकुंडाचियेमाझारीं ॥
स्नानदाननकरितांनरनारी ॥ स्वर्गलोकींजातांसत्वरी ॥ पतनपावतीतात्काळ॥४५॥





१ तुझ्यासाठीं. २ गाईला ताडणकरणें हेंच पापाचें उत्पत्तिस्थान.

गाईचीअवज्ञा[1]जेकरिती ॥ स्वर्गींजातांपतनपावती ॥ तुह्मांमजसीसांगीतलेंती ॥ भी
मास्नानदुर्लभ[2] ॥ ४६ ॥ तैसेंचिकमलजेचेंदर्शन ॥ परमदुर्लभअसेजाण ॥ तेंमी
नघेतल्याकारण ॥ स्वर्गप्राप्तीमजकैशी ॥४७॥ माधवबोलेतयासी ॥ स्वर्गापूर्वींयम
लोकींगेलासी ॥ तेथेंजेंजेंचरित्रपाहिलेंसी ॥ मजप्रतिनिवेदावें ॥४८॥ विश्वावसूबो
लेमाधवातें ॥ मीगेलोंयमधर्मपुरीतें ॥ तेथेंपाहिलेंनरकातें ॥ कीटकयुक्तअसेतो ॥
॥ ४९ ॥ तयानरकाचियेमाझारीं ॥ पापयुक्तनरनारी ॥ लेटूनिदेतीनानापरी ॥क
ष्टदेतीतयांतें ॥ ५० ॥ आक्रोशकरितीप्राणिमात्र ॥माझेंमनझालेंव्यग्र ॥ यमलोकीं
चाजाचफार ॥ पाहतांमनक्ष्यालेंमाझें ॥५१॥ तयेस्थानींअन्यनरक ॥ पाहिलेअस
तीम्यांअनेक ॥ यातनाअसतीभयदायक ॥ वर्णनकरण्याअशक्तमी ॥ ५२ ॥ त्यां
तीलयातनाकांहींतूतें ॥ सांगतोंकरींश्रवणातें ॥ श्रवणकरींनरकनामांतें ॥ एकचि
त्तेंपरियेसा ॥ ५३ ॥ तप्तवालुकेचेंस्थान ॥ महारौरवआणिरौरवजाण ॥ कुंभिपा
कनिरुच्छ्वास[3]न ॥ महाभयंकरअसतीहे ॥ ५४ ॥ असि[4]पत्रवनभयंकर ॥ लाला[5]कुं
डअसेथोर ॥ त्याकुंडींघालूनिप्राणिमात्र ॥ लालाभक्षवितीमहाक्रोधें ॥ ५५ ॥ अंध
मुखअंधकूपदारुण ॥ तैसीचवैतरणीनदीजाण ॥ बळेंचीकरवितीमूत्रपान ॥ विष्ठा

१ अपमान. २ मिळण्यालाकठीण. ३ श्वासही सोडितां येतनाहीं असा. ४ तरवारीच्या धारेसारखी यावनांतील पानांला धार असते. ५ लाळ.

कुंडएकअसे ॥ ५६ ॥ इतुकेनरकसांगीतलेतुजसी ॥ आतांकथितोंयातनेंसी ॥ ए
कचित्तेंकरींश्रवणासी ॥ यथामतिसांगतों ॥५७॥ विष्ठालेपनशरीरींकरिती॥विष्ठाचि
॥ ३ ॥ भक्षणालागींदेती ॥ रेतपानक्रोधेंकरविती ॥ जाळितीसर्वसंधींतें ॥ ५८ ॥ अग्नी ॥८॥
वरीकरवितीशयन ॥ तैसेंचिमुसळेंकरितीमर्दन ॥ अन्यकाष्ठांहींकरून ॥ तोडिती
मोडितीशरीरातें ५९ ॥ उंचउचलोनिटाकिती ॥ गदादंडांहींताडिती ॥ गजदंतांचेप्र
हारकरिती ॥ सर्पदंशितीनानास्थानीं ॥ ६० ॥ धूम्रावरीटांगितीउलट ॥ पाशेंबंधन
करितीसुभट ॥ शूळरोवुनियांनिकट ॥ नेवूनिचढवितीतयावरी ॥ ६१ ॥ क्षारोद
कआणून ॥ अंगावरीकरितीसेचन ॥ मुखनासिकींघालून ॥ कष्टवितीनानापरी ॥
॥ ६२ ॥ क्षारोदकपानकरविती ॥ क्रोधेंलवणभक्षणादेती ॥स्नायूछेदूनियांबांधिती ॥
अस्थिश्लेष्मांचेंभोजन ॥ ६३ ॥ वृक्षावरीचढवूनी ॥ देतीखालींढकलोनी ॥ जला
माजीबुडूनी ॥ प्राणजाऊंपाहेतयीं ॥ ६४ ॥ मोठेमोठेपाषाण ॥ मस्तकावरीदेतीजा
ण ॥ कंटकांवरीकरवितीशयन ॥ ऐशाअसतीयातना ॥ ६५ ॥ पिंपीलिकाडसवि
तीशरीरीं ॥ पक्ष्यांकडूनिटोंचवितीभारी ॥ व्याघ्रपीडितीनानापरी ॥ शिवायेतीभक्षा
वया ॥ ६६ ॥ क्रोधेंआपटितीपृथ्वीसी ॥ कर्दमींकरवितीशयनासी ॥ दुर्गंधसेववि ॥३॥
तीबळेंसी ॥ येणेंपरीपीडिती ॥ ६७ ॥ बहुतअसतीशस्त्रास्त्रेंजेथ ॥ शयनकर

१ हस्तिदंत. २ खालीमस्तककरून. ३ मीठ ४ शरीरांतीलघाणेरडे पदार्थ. ५ मुंग्या. ६ भालू.

वितीनेऊनितेथ ॥ महातीक्ष्णशस्त्रांहींपीडित ॥ अत्यंतखेदहोतसे ॥ ६८ ॥
अत्युष्णतैलाचेंपान ॥ बळेंकरवितीकटुभक्षण ॥ कटुकेषायहीदेतीजाण॥तप्तपाषाण
भक्षविती ॥ ६९ ॥ अत्युष्णअतिशीतोदकपान ॥ बळेंपाडितीदंतजाण ॥ तप्तलो
हावरीकरवितीशयन ॥ अनेकविधपीडादेती ॥ ७० ॥ सूचीघेऊनियांहस्तीं ॥
संधींसंधींमाजीरोविती ॥ नेत्रद्वयांमाजीघालिती ॥ दुःखहोईअपार ॥ ७१ ॥ शि
श्नआणीवृषण ॥ यांसीलोंहगोळाकरितीबंधन ॥ चालवितातीक्रोधेंकरून ॥ शिश्न
वृषणतुटोंपाहती ॥ ७२ ॥ याप्रकारेंकरून ॥ नानाविधयातनापाहिल्याजाण ॥
त्यांचेंकरावयायथार्थकथन ॥ मीसमर्थनव्हेंची ॥७३॥ त्यादारुणपाहिल्यायातना॥
मगस्वर्गींगेलोंजाणा ॥ उपभोगघेतलेनाना ॥ जोंवरीहोयपुण्यक्षय ॥७४॥ क्षयहो
तांचिपुण्यासी॥पतनपावलोंभूमीसी॥दयाकरूनियांमजसी॥स्वर्गमिळेऐसेंकरा॥७५॥
येणेंपरीतयाचेंवचन ॥ माधवेंकरूनियांश्रवण ॥ आश्चर्ययुक्तझालाजाण ॥ उठोनि
उभाराहिला ॥ ७६ ॥ स्वर्गभ्रष्टतेनेंविठ्ठल ॥ पाहूनिमाधवदयाळ ॥ बोलिलात
यासीवचनप्रेमळ ॥ सूतह्मणेशौनकादिकां ॥ ७७ ॥ माधवबोलिलातयासी ॥ तुझा
पुत्रकरीलभीमास्नानासी ॥ भीमादर्शनघेतांप्रेमेसी ॥ स्वर्गप्राप्तीतुजहोय ॥ ७८ ॥
भीमपर्वताचियेठायीं ॥ भीमातीर्थअसेपाहीं ॥ श्रेष्ठअसेलोकींतिहीं ॥ महापापाचें

१ कडू. २ काढा. ३ लोखंडाचा गोळा शिश्नाग्र व वृषणाला बांधितात.

कुंडएकअसे ॥ ५६ ॥ इतुकेनरकसांगीतलेतुजसी ॥ आतांकथितोंयातनेंसी ॥ एकचित्तेंकरींश्रवणासी ॥ यथामतिसांगतों ॥५७॥ विष्ठालेपनशरीरींकरिती॥विष्ठाचिभक्षणालागींदेती ॥ रेतपानक्रोधेंकरविती ॥ जाळितीसर्वसंधींतें ॥ ५८ ॥ अग्नीवरीकरवितीशयन ॥ तैसेंचिमुसलेंकरितीमर्दन ॥ अन्यकाष्ठांहींकरून ॥ तोडितीमोडितीशरीरातें ५९ ॥ उंचउचलोनिटाकिती ॥ गदादंडांहींताडिती ॥ गजदंतांचेप्रहारकरिती ॥ सर्पदंशितीनानास्थानीं ॥ ६० ॥ धूम्रावरीटांगितीउलटें ॥ पाशेंबंधनकरितीसुभट ॥ शूळरोवुनियांनिकट ॥ नेवूनिचढवितीतयावरी ॥ ६१ ॥ क्षारोदकआणून ॥ अंगावरीकरितीसेचन ॥ मुखनासिकींघालून ॥ कष्टवितीनानापरी ॥ ॥ ६२ ॥ क्षारोदकपानकरविती ॥ क्रोधेंलवणभक्षणादेती ॥ स्नायूछेदूनियांबांधिती ॥ अस्थिश्लेष्मांचेंभोजन ॥ ६३ ॥ वृक्षावरीचढवूनी ॥ देतीखालींढकलोनी ॥ जलामाजीबुडूनी ॥ प्राणजाऊंपाहेतयीं ॥ ६४ ॥ मोठेमोठेपाषाण ॥ मस्तकावरीदेतीजाण ॥ कंटकांवरीकरवितीशयन ॥ ऐशाअसतीयातना ॥ ६५ ॥ पिपीलिकाडसवितीशरीरीं ॥ पक्ष्यांकडूनिटोंचवितीभारी ॥ व्याघ्रपीडितीनानापरी ॥ शिवांयेतीभक्षावया ॥ ६६ ॥ क्रोधेंआपटितीपृथ्वीसी ॥ कर्दमींकरवितीशयनासी ॥ दुर्गंधसेववितीबळेंसी ॥ येणेंपरीपीडिती ॥ ६७ ॥ बहुतअसतीशस्त्रास्त्रेंजेथ ॥ शयनकर

१ हस्तिदंत. २ खालीमस्तककरून. ३ मीठ ४ शरीरांतीलघाणेरडे पदार्थ. ५ मुंग्या. ६ भालू.

वितीनेऊनितेथ ॥ महातीक्ष्णशस्त्रांहीं पीडित ॥ अत्यंतखेदहोतसे ॥ ६८ ॥
अत्युष्णतैलाचेंपान ॥ बळेंकरवितीकटुभक्षण ॥ कटुकेषायहीदेतीजाण॥तप्तपाषाण
भक्षविती ॥ ६९ ॥ अत्युष्णअतिशीतोदकपान ॥ बळेंपाडितीदंतजाण ॥ तप्तलो
हावरीकरवितीशयन ॥ अनेकविधपीडादेती ॥ ७० ॥ सूचीघेऊनियांहस्तीं ॥
संधींसंधींमाजीरोविती ॥ नेत्रद्वयांमाजीघालिती ॥ दुःखहोईअपार ॥ ७१ ॥ शि
श्नआणीवृषण ॥ यांसीलोहगोळाकरितीबंधन ॥ चालवितातीक्रोधेंकरून ॥ शिश्न
वृषणतुटोंपाहती ॥ ७२ ॥ याप्रकारेंकरून ॥ नानाविधयातनापाहिल्याजाण ॥
त्यांचेंकरावयायथार्थकथन ॥ मीसमर्थनव्हेंची ॥७३॥ त्यादारुणपाहिल्यायातना॥
मगस्वर्गींगेलोंजाणा ॥ उपभोगघेतलेनाना ॥ जोंवरीहोयपुण्यक्षय ॥७४॥ क्षयहो
तांचिपुण्यासी॥पतनपावलोंभूमीसी॥दयाकरूनियांमजसी॥स्वर्गमिळेऐसेंकरा॥७५॥
येणेंपरीतयाचेंवचन ॥ माधवेंकरूनियांश्रवण ॥ आश्चर्ययुक्तझालाजाण ॥ उठोनि
उभाराहिला ॥ ७६ ॥ स्वर्गभ्रष्टतेनेंविठ्ठल ॥ पाहूनिमाधवदयाळ ॥ बोलिलात
यासीवचनप्रेमळ ॥ सूतह्मणेशौनकादिकां ॥ ७७ ॥ माधवबोलिलातयासी ॥ तुझा
पुत्रकरीलभीमास्नानासी ॥ भीमादर्शनघेतांप्रेमेसी ॥ स्वर्गप्राप्तीतुजहोय ॥ ७८ ॥
भीमपर्वताचियेठायीं ॥ भीमातीर्थअसेपाहीं ॥ श्रेष्ठअसेलोकींतिहीं ॥ महापापाचें

१ कडू. २ काढा. ३ लोखंडाचा गोळा शिश्नाग्र व वृषणाला बांधितात.

नाशक ॥७९॥ त्यास्नानाचेयोगेंकरून ॥ तुजसीस्वर्गप्राप्तीजाण ॥ दुसराउपायनसे
चिआंन ॥ विश्वावसूजाणपां ॥ ८० ॥ जयेस्थानींजगन्माता ॥ कमलजादेवीअसे
॥ ४ ॥ आतां ॥ तियेचेंदर्शनकरितां ॥ पापमुक्तहोशीलतूं ॥ ८१ ॥ माधवऋषीचेंवचन ॥ ॥ ८ ॥
मोक्षदायकश्रवणकरून ॥ पुत्रासीहाकामारिल्यातीन ॥ देवावसूनामानें ॥ ८२ ॥
पुत्रयेऊनितयेस्थानीं ॥ पित्यासीअवलोकनकरूनी॥विचारिताजाहलास्वर्गपतनीं॥
कायकारणजाहलें ॥ ८३ ॥ विश्वावसूनेंतयेकालीं ॥ आपुलीसर्वस्थितीकथिली ॥
त्वांभीमाशंकरींजावूनिवहिलीं ॥ स्नानदानेंकरावीं ॥ ८४ ॥ ऐसेंऐकोनियांवचन ॥
भीमाशंकरींकेलेंगमन ॥ स्नानकरूनिपिंडदान ॥ भीमाशंकरींकरिताझाला ॥ ८५ ॥
तदनंतरेंकमलजादर्शन ॥ घेऊनिनमस्कारकेलाजाण ॥ त्यापुण्याचेबळेंकरून ॥ गो
तोंडणपापनष्टझालें ॥ ८६ ॥ विश्वासूझालापापमुक्त ॥ माधवाचीस्तुतीकरित ॥ इ
तुक्यांतविमानयेत ॥ स्वर्गाहुनीतयासी ॥ ८७ ॥ तयाविमानामाझारी ॥ चढताझाला
झडकरी ॥ स्तवनकेलेंसुरवरीं ॥ अत्यानंदेंपर्यसा ॥ ८८ ॥ देवगंधर्वांहींवेष्टित ॥
अप्सराअग्रभागींनृत्यकरीत ॥ येणेंप्रकारेंकरूनिजात ॥ स्वर्गलोकींहर्षयुक्त॥८९॥
भीमातीर्थपरमपावन ॥ नरनारीकरूनिस्नान ॥ कमलजेचेंघेतांदर्शन ॥ स्वर्गींजाती
येणेंपरी ॥ ९० ॥ नानाविधसुखोपभोग ॥ भोगितीआनंदेंलागवेग ॥ यातीर्थाहुनी ॥ ४ ॥

१ अन्य. २गाईला मारल्याचें पाप.

हीप्रयाग ॥ महिमाअसेजाणावा ॥ ९१ ॥ भीमानदीअसेपुण्यदा ॥ स्नानमात्रेंनष्ट आपदा ॥ कमलजादर्शनेंसर्वसंपदा ॥ प्राप्तहोतीतात्काळ ॥ ९२ ॥ भीमापुण्यदाय कजाण ॥ तियेचेंप्रेमेंकरितांस्मरण ॥ सर्वपापाचेंनिरसन ॥ तात्काळहोईजाणपां ॥ ॥ ९३ ॥ हीकथाजेप्रेमेंवाचिती ॥ अथवाभक्तीनेंश्रवणकरिती ॥ तयांप्राप्तअखिलसं पत्ती ॥ अंतींस्वर्गमिळेजाणा ॥ ९४ ॥ याकथेचाअव्हेर ॥ जेकरितातीदुराचार ॥ तयांसीयातनाअपार ॥ जाचितीयमदूतक्रोधानें ॥ ९५ ॥ सूतह्मणेशौनकादिकां ॥ हीकथाउद्धरीभावीकलोकां ॥ नास्तिकअसतीलोकजेकां ॥ तयांतेंकैंचीफलप्राप्ती ॥ ॥ ९६ ॥ हीकथानारदाकारणें ॥ सांगीतलीब्रह्मदेवानें ॥ तीमीतुह्मांसियथामतीनें ॥ निवेदिलीअसेहो ॥ ९७ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याकथेचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृ पेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ९८ ॥ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमा चरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ विश्वावसुउद्धरणंनामअष्टमाध्यायगोडहा ॥ ८ ॥

॥ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ ५२९ ॥ ॥ ॥ ॥

---

१ मुक्तकरी.



श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः॥ ॐनमोजीआनंदकंदा ॥
स्मशानवासियाभक्तवरदा ॥ कैलासींवससीतूंसदा ॥ पार्वतीरमणाजगद्गुरो ॥ १ ॥
तुझेंतत्वमीनजाणें ॥ स्वरूपकैसेंआहेहेंनेणें ॥ ह्मणोनीवाटेलाजिरवाणें ॥ कल्या
णार्थतुजनमो ॥ २ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ भीमाशंकराचेनैर्ऋत्यदिशी ॥ कर्म
मोचकवापीपरियेसीं ॥ स्नानमात्रेंपापमुक्ती ॥ ३ ॥ नारदबोलेब्रह्मदेवातें ॥ क
र्ममोचकवापीस्थानअसेकेंउतें ॥ पापमुक्तजाहलाकोणतेथें ॥ मजप्रतीनिवेदावें
॥ ४ ॥ पितामहवदेनारदासी ॥ येकविप्रहेमसंचकनामेंसी ॥ धनाढ्यअसेपरियेसीं ॥
परमपापीदुराचारी ॥ ५ ॥ धनमदेंजाहलाउन्मत्त ॥ पापेंबहुविधकरित ॥ तरुणअ
सेबलयुक्त ॥ दुराचारेंवर्तनकरी ॥ ६ ॥ व्यसनींजाहलाआसक्त ॥ स्वधर्मीअसे
पराङ्मुख ॥ प्रियवाटेविषयसुख ॥ कामकर्दमींमग्नअसे ॥ ७ ॥ नानाजातींचिया
स्त्रियाअसती ॥ त्यांचेठाईंअसेप्रीती ॥ स्वधर्मतयातेंनावडती ॥ ऐसापापीदुरात्मा
॥ ८ ॥ नास्तिकअसेतोपरम ॥ दुष्टप्रतिग्रहींवसेप्रेम ॥ गणिकेचेठाईंवसेकाम ॥ दु
राचारीअसेऐसा ॥ ९ ॥ अभक्ष्यअन्नभक्षणकरी ॥ दुष्टजनींवसेनिरंतरीं ॥ नित्य
कर्माचात्यागकरी ॥ नैमित्तिकहीतैसेंची ॥ १० ॥ दानधर्मनावडेतया ॥ परस्त्रिये
विषयींमाया ॥ मातृवचनाधिक्कारुनियां ॥ वर्तेआपुलेइच्छेपरी ॥ ११ ॥ पितृवचन

१ दक्षिण आणि पश्चिम यांमधील दिशा. २ कसें. ३ हेंनाव. ४ विषय हाच चिखल. ५ तैल शय्याइत्यादिकदानें.

नकरीश्रवण ॥ कुमार्गेंवर्तनींअसेमन ॥ दुरात्मादुष्टबुद्धिपूर्ण ॥ मातापितरांनिंदीतसे ॥ १२ ॥ दुष्टअसेअधर्मनिरत ॥ निंद्यंगायनतयासीआवडत ॥ परस्त्रियेविषयींप्रीत ॥ वसेत्याचियेमानसीं ॥ १३ ॥ ऐसामदांधतोब्राह्मण ॥ वारस्त्रीविंटशैंलूषजाण॥ नटचारणबंदीजन ॥ द्रव्येंसंतुष्टकरीतसे ॥ १४ ॥ अपात्रींदेतसेधनसर्व ॥ अंगींवसेबहुतगर्व ॥ उखरंभूमीसिधान्यसर्व ॥ पेरितीमूर्खज्यापरी ॥ १५ ॥ सत्पात्रींनदेईदान ॥ ब्राह्मणमुखींनघालीअन्न ॥ जयाचापुत्रगजानन ॥ ऐशाशंकरानवंदी ॥१६॥ शंकरनामस्मरतांपाहीं ॥ कल्याणसर्वदातयाचेंहोई ॥ ऐशाशंकरानवंदीकदाही ॥ नामहीस्मरणकरीना ॥ १७ ॥ असोयेणेंप्रकारेंकरून ॥ क्षयपावलेंसर्वधन ॥ मागूनिविचारजाह्लापूर्ण ॥ क्षणिकसंसारह्मणोनी ॥ १८ ॥ विप्रपश्चात्तापकरी ॥ धर्महीनकेलाम्यांअणुंवरी॥ ब्राह्मणसंतर्पणपरमेश्वरीं ॥ लीनझालोंनाहींच ॥१९॥ नाहींकेलींव्रताचरणें ॥ तपश्चर्यामुळींचनेणें ॥ नाहींकेलींतीर्थाटनें ॥ द्रव्ययोगेंअंधजाह्लों ॥ २० ॥ हरीचेंनामनाहींस्मरिलें ॥ कामासक्तमनजाह्लें ॥ द्रव्यसंपूर्णघालविलें ॥ चिंताकरीयेणेंपरी ॥ २१ ॥ वशहोऊनिम्यांस्त्रियांसी ॥ संगतीनकेलीविद्वज्जनांसी ॥ अंतींयमदूतनेतीलमजसी ॥ यमपुरीसीनिश्चयें ॥ २२ ॥ यमदूतकंठींघालितीलपाश ॥ तेंव्हांशरणजाऊंकोणास ॥ यातनाभोगितांबहुवस ॥



१ वाईटगाणें (लावण्याइत्यादिक). २ कुटण्या. ३ ठक. ४ सोंगाड्या. ५ वाईटजमीन. ६ थोडाही. ७ तीर्थयात्रा. ८पुष्कळ

कोणमातेंरक्षीलतेथें ॥ २३ ॥ ऐसाअत्यंतपापीमी ॥ यमदूतलोटितीलक्षारकर्दमीं॥
तेथेंतोडितीलकीटकृमी ॥ दुःखहोईलअपार ॥ २४ ॥ येणेंपरीदुःखभोगितां ॥ यम
दूतींबहुपीडादेतां ॥ कायकरूंकोठेंजाऊंआतां ॥ ऐशीस्थितीहोईल ॥ २५ ॥ येणेंपरी
पश्चात्तापकरी ॥ आतांकोणमजपापमुक्तकरी ॥ अखिलधुंडितांधरित्री ॥ ऋषीअत्रि
भेटला ॥ २६ ॥ सर्वधर्मांचाप्रवक्ता ॥ वेदशास्त्रांचाजाणता ॥ ऐसाऋषीभेटलातत्व
ता ॥ तयाविप्राकारणें ॥ २७ ॥ तयातेंकरूनियांनमन ॥ ह्मणेस्वामीमीआलोंशर
ण ॥ माझेंकराजीरक्षण ॥ बहुतपापेंकेलींम्यां ॥ २८ ॥ तुह्मींचमाझेमातापिता ॥ ब
हुतपापेंकेलींताता ॥ माझेंरक्षणकराआतां ॥ शरणअसेंतुह्मांसी ॥ २९ ॥ आतां
करामाझेंरक्षण ॥ तुह्मांअसेंमीअनन्यशरण ॥ ह्मणोनीवंदीतसेचरण ॥ तयाअत्री
ऋषीचे ॥ ३० ॥ येणेंपरीविप्रबोलत ॥ ऐकूनिअत्रिऋषीद्रवत ॥ कृपाउपजलीमनां
त ॥ बोलताजाहलातयासी ॥ ३१ ॥ अत्रिह्मणेब्राह्मणासी ॥ पश्चातापजाहलातव
मानसीं ॥ सर्वपापेंगेलींपरियेसीं ॥ जींजींपूर्वींकेलींहोतीं ॥ ३२ ॥ ज्यासीपश्चात्ता
पअंतःकरणीं ॥ सर्वपापांचीहोयधुणी ॥ येणेंप्रकारेंअत्रिमुनी ॥ सांगताझालाविप्रा
सी ॥ ३३ ॥ तरीआतांतूंसत्वरी ॥ जाऊनिभीमाशंकरीं ॥ यथाविधिस्नानकरीं ॥ पा
पमुक्तहोशील ॥ ३४ ॥ तयास्नानाचेयोगेंकरून ॥ कर्ममुक्तहोसीलजाण ॥ अत्रीचेंऐ

१ चिखलांत २ पृथ्वी. ३ उत्तमवक्ता. ४ कृपायुक्त.

कोनियांवचन ॥ भीमाशंकरींजातसे ॥ ३५ ॥ भीमाशंकरासीवंदून ॥ कर्ममोचक
वापींतकेलेंस्नान ॥ तोहेमसंचकब्राह्मण ॥ पापमुक्तजाहला ॥ ३६ ॥ सूतह्मणेशौन
कादिकांसी ॥ स्नानकरितांत्यावापीसी ॥ पापमुक्तहोतांद्विजासी ॥ विमानआलें
स्वर्गीहुनी ॥ ३७ ॥ विप्रदिव्यशरीरहोऊन ॥ विमानींआरूढलाजाण ॥ स्वर्गलोकीं
जावोन ॥ अक्षयस्थानींराहिला ॥ ३८ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ विधीसांग
ताजाहलानारदासी ॥ तीचकथामीतुह्मांसी ॥ यथामतीनिवेदिली ॥ ३९ ॥ रामाश्र
येंकरूनिजाण ॥ याकथेचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो॥४०॥
इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ कर्ममो
चकवापीमहिमावर्णनं हेम्रसंचकविप्रोद्धरणंनामनवमाध्यायरसाळहा ॥ ॥ ॥
॥ ॥ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ ५२३ ॥ ॥ ॥ ॥

१ हें नांव.




अध्याय १० वा
ऋमर्दीन.
स्त्री समुदाय.
ऋषिसमुदाय व
ऋमर्दीन.
ऋमर्दीन.
श्रोतेजन.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ ॐनमोजीपुराणपुरुषा ॥
हिमनगजामातामहेशा ॥ नंदिवहनाभुजंगभूषा ॥ दक्षजामाताशंकरा ॥ १ ॥ सक
ळजगाचाउत्पन्नकर्ता ॥ तूंचिहोसीतयारक्षिता ॥ तूंचिसंहारकरिसीताता ॥ गौरीह
रातुजनमो ॥ २ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ भीमाशंकराचेदक्षिणदिशी ॥ ज्ञानवा
पीह्मणूनपरियेसी ॥ श्रेष्ठअसेजगामाजी ॥ ३ ॥ ऐकोनिविधीचेंवचन ॥ नारदकरी
तयातेंप्रश्न ॥ ज्ञानवापींतस्नानकरोन ॥ ज्ञानवानकोणझाला ॥ ४ ॥ ऐकोनितयाचें
वचन ॥ ब्रह्मदेवसांगेतयाकारण ॥ सुबोधनामें[1]करून ॥ होताकुत्सपुरीमाजी ॥५॥
ब्राह्मणअसेवेदज्ञ[2] ॥ सकळशास्त्रींअसेज्ञान ॥ नित्यकरीस्वधर्माचरण ॥ श्रवणक
रींनारदा ॥ ६ ॥ तयाविप्रासीएकसुत ॥ होताझालासुंदरअत्यंत ॥ शास्त्रादिवेदवेदां
त ॥ कांहींचनेणेमूर्खतो ॥ ७ ॥ गायनींवादनींतयाचीबुद्धी ॥ नित्यधिक्कारितीतया
सुधी[3] ॥ नित्यवाजवीमृदंगादी ॥ परस्त्रियेंसीरतझाला ॥ ८ ॥ गायनवादनयोगेंक
रून ॥ स्त्रियावशजाहल्यासंपूर्ण ॥ उपभोगीतयांमंदांध[4]होऊन ॥ कामासक्तजाह
ला ॥ ९ ॥ दुष्टप्रतिग्रहघेईसतत ॥ तेणेंआपुलेंउदरभरित ॥ दैवेंएकदाआश्रमांत ॥
अर्चनऋषीचेपातला ॥ १० ॥ अर्चनऋषीचेआश्रमामाजी ॥ ऋषीबैसलेअसतांस
माजीं[5] ॥ पौराणिकी[6]कथासहजीं ॥ निघाल्याअसतीपरियेसा ॥ ११ ॥ तयाकथेंमा

---

१ हेंनांव. २ वेदजाणणारा. ३ बुद्धिवान. ४ कामांध. ५ समूहांत. ६ पुराणांतील.

॥ १ ॥ जीवविवरण ॥ पापाचरणाचेंनिघालेंजाण ॥ सुमर्शनकरीश्रवण ॥ अर्चनऋषीचेमु
खींहुनी ॥ १२ ॥ जेअसतीपरदारासक्त ॥ विषयांतूनीनहोतीमुक्त ॥ यमदूततयां
सीबांधित ॥ यमपुरींनेतीतात्काळ ॥ १३ ॥ नरककुंडामाजीघालिती ॥ तप्तभूमीव
रीचालविती ॥ असिपत्रवनींहिंडविती ॥ जाचितातीयेणेंपरी ॥ १४ ॥ ऐसेंकरोनि
यांश्रवण ॥ त्यालामानसींतोपूर्ण ॥ बोलताझालाऋषीसवचन ॥ श्रवणकराहोसर्व
त्र ॥ १५ ॥ म्यांअज्ञानेंकरून ॥ परदारासक्तझालोंजाण ॥ प्रेमेंकरीतसेंवादनगाय
न ॥ पापीअसेंमीदुरात्मा ॥ १६ ॥ मजमानसींवाटतेभीती ॥ शरीरकंपायमानहोई
अती ॥ अल्पसौख्यींधरोनीप्रीती ॥ दुष्कर्माचरणकेलेंम्यां ॥ १७ ॥ धिक्कारचिअसो
मजसी ॥ बद्धझालोंकामपाशीं ॥ बोलताजाहलाऋषीसी ॥ मुक्तकरामजस्वामियां ॥
॥ १८ ॥ तुह्मांलागींमीआलोंशरण ॥ माझेंकराजीरक्षण ॥ जेणेंप्राप्तहोईलज्ञान ॥
ऐसाउपायमजसांगा ॥ १९ ॥ येणेंप्रकारेंभाषणासी ॥ ऐकोनियांअर्चनऋषी ॥ बो
लताझालासुमर्शनासी ॥ भीमाशंकरींजाईंतूं ॥ २० ॥ जाऊनियांभीमाशंकरीं ॥
स्नानकरींज्ञानकूपामाझारी ॥ ज्ञानप्राप्तहोईलझडकरी ॥ निश्चयमानसींधरींतूं ॥ २१
येणेंपरीऐकूनिवचन ॥ भीमाशंकरींकेलेंगमन ॥ ज्ञानवापींतकरीतस्नान ॥ यथावि
धीकरूनियां ॥ २२ ॥ तयास्नानाचेयोगेंकरून ॥ पापमुक्ततोजाहलाजाण ॥ सूतह्म ॥ १ ॥

१ स्त्रिया.

णेशौनकादिकांलागोन ॥ ज्ञानप्राप्तीझालीतया ॥ २३ ॥ नारदह्मणेब्रह्मदेवासी ॥ तयाज्ञानप्राप्तीझालीकैसी ॥ तेंसांगामजविस्तारेंसी ॥ कृपेकरूनिविधांत्या ॥२४॥ विधीह्मणेनारदासी ॥ श्रवणकरींएकचित्तेंसी ॥ सुमर्शनाचियावचनासी ॥ निवेदि तोंतुजलागीं ॥ २५ ॥ सुमर्शनबोलेवचन ॥ ब्रह्मज्ञानीजोअसेजन ॥ वैकल्पिकजेभ्र मपूर्ण ॥ त्यांचात्यागकरीतसे ॥ २६ ॥ प्रथममायास्वरूपासी ॥ सांगतोंतुजविस्ता रेंसी ॥ नंतरज्ञानसाधनासी ॥ तुजसीमीनिवेदीन ॥ २७ ॥ मोहमायेतेंत्यागावें ॥ आत्मस्वरूपओळखावें ॥ जेंओळखितांचिबरवें ॥ मुक्तकरीभवांतुनी ॥ २८ ॥ श रीरींनसतांआत्मता ॥ शरीरचिआत्मामानितीतत्वता ॥ तयासीचह्मणिजेअज्ञता ॥ जाणनारदानिश्चयें ॥ २९ ॥ तीचजाणतूंमाया ॥ मोहूनटाकीजगाया ॥ भ्रमप्राप्त होतसेवायां ॥ संसारसत्यभासतसे ॥ ३० ॥ यामायेचींस्वरूपेंदोनी ॥ निश्चि तकेलींअसतीऋर्षीनीं ॥ चित्तठेवींनारदाश्रवणीं ॥ त्यांतूनिप्रथमजगअसे ॥ ३१ ॥ लिंगादिब्रह्मपर्यंत ॥ स्थूलसूक्ष्मभेदेंजगत ॥ सर्वअसेमायारचित ॥ निश्चयधराहो मानसीं ॥ ३२ ॥ दुसरेंरूपअसेज्ञान ॥ आत्मस्वरूपजेंपूर्ण ॥ त्यासीअसेवेष्टून ॥ भिन्ननेहेकदाकाळीं ॥ ३३ ॥ ज्ञानप्राप्तहोतांनरासी ॥ आत्मस्वरूपयेईहातासी ॥ पूर्णविचारकरितांपरियेसीं ॥ जगअसेमिथ्याची ॥ ३४ ॥ मायेच्याभ्रमेंकरून ॥ आ

१ ब्रह्मदेवा. २ विकल्पानें होणारे. ३ संसारांतून. ४ भ्रांति.

 त्मस्वरूपींजगकल्पिलेंजाण ॥ रज्जुं[1]असतांभुजंग[2]ज्ञान ॥ जेंवीनराहोतसे ॥ ३५ ॥
जेंजेंनेत्रांहींदिसतें ॥ श्रवणांहींऐकूंयेतें ॥ ज्यागोष्टीचेंस्मरणहोतें ॥ सर्वहीअसत्य 
 जाणावें ॥ ३६ ॥ जेंवीस्वप्नांतीलविचार ॥ मिथ्याभासतीसर्वत्र ॥ देहहासंसारतरु
वर॥दृढमूलअसे ॥ ३७ ॥ तयावृक्षाचेंफल ॥ पुत्रसंतानादिसकल ॥ मोहपाशेंबद्ध 
विकल ॥ होऊनिराहे ॥ ३८ ॥ पंचभूतांपासूनीउत्पन्न ॥ देहअसेस्थूल[3]पू
र्ण ॥ क्षेत्रह्मणतीसज्ञान ॥ मूर्खह्मणतीदेहहा ॥ ३९ ॥ देहहाचिआत्माह्मणती
॥ देहींचदृढवुद्धीधरिती ॥ ऐशामोहींमग्नहोती ॥ अज्ञानजन ॥ ४० ॥ परं
तुजीवदेहभिन्न ॥ परमात्मानिरामयपूर्ण ॥ तयाजीवज्ञानाकारण ॥ साधनेंतुजसीं
निवेदितों ॥ ४१ ॥ परमात्माचीअसेजीव ॥ येथेंनमानींभेदभाव ॥ हिंसादिदुराच
रणसर्व ॥ निश्चयेंसीत्यागावें ॥ ४२ ॥ पापाचरणसोडोनिद्यावें ॥ सर्वांशींसरळव
र्तावें ॥ मनवाणीचियाभावें ॥ सद्गुरुसेवनकीजे ॥४३॥ अंतर्बाह्यशुद्धीकरावी ॥ स
त्कर्मींस्थिरताअसावी ॥ मनवाणीदेहदंडेंबरवी ॥ दुष्ट[4]इच्छानष्टकीजे ॥ ४४ ॥ अहं
कारसर्वटाकावा ॥ आसक्तिस्नेहसोडावा ॥ स्त्रीपुत्रधनादिठेवा ॥ आपुलाऐसानमा
नीं ॥ ४५ ॥ दैवेंप्राप्तझालेंसुख ॥ तेणेंनमानींअत्यंतहरिख ॥ पुढेंप्राप्तहोतांदुःख ॥ 
वाईटवाटोंनेदींमना ॥ ४६ ॥ सर्वभूतींभावसमान ॥ सोडूनिद्यावेंविषयसेवन ॥ वि

---

१ दोरी. २ सर्पआहे असाभासहोणें. ३ जड. ४ वाईट. ५ सुखदुःखीं समान असावें.

षयमानावाआत्मज्ञान ॥ त्याचेंचिसेवनकीजे ॥ ४७ ॥ जनांचीपीडानसेजेथ ॥ ऐ
शास्थानींवसेंनिश्चित ॥ आत्मज्ञानहोईलप्राप्त ॥ ऐसायत्नकीजे ॥ ४८ ॥ प्राकृतज
नांचीसंगती ॥ अन्यविषयींनसावीरती ॥ आत्मज्ञानींधरावीप्रीती॥वेदांतअवलोक
नकरावा ॥ ४९ ॥ वेदांताचाअर्थसमजतां ॥ पूर्वोक्तप्रकारेंआचरतां ॥ आत्मज्ञान
येईलहाता ॥ असत्यनोहेकल्पांतीं॥५०॥आत्माअसेनित्यशुद्ध॥मायेनेंभासतसेबद्ध॥
तरीनमानींतूंसुबद्ध ॥ नित्यमुक्तअसेकीं ॥ ५१ ॥ ऐसेंज्ञानजाहलेंजयासी ॥ आ
त्मबुद्धीदृढत्यासी ॥ साक्षात्‌अनुभवपरियेसीं ॥ होईलतया ॥५२॥ आत्मासर्वत्रसं
पूर्ण ॥ सच्चिदानंदअव्ययजाण ॥ उपाधीरहितअसेनिर्गुण ॥ कष्टेंकरूनिज्ञानहोई॥
॥ ५३ ॥ निश्चयेंआत्माअसेएक ॥ बुद्धीनधरावीद्वितीयक ॥ देवादिकांचाहीबुद्धिप्र
काशक ॥ तोचिअसे ॥ ५४ ॥ विधीह्मणेनारदासी ॥ ज्ञानवापीच्यास्नानेंशी ॥ ऐसेंज्ञा
नझालेंसुमर्शनासी ॥ दिव्यदेहझालातो ॥ ५५ ॥ विमानींआरूढहोऊन ॥ स्वर्गीं
करिताझालागमन ॥ तयातेंमोक्षसुखपूर्ण ॥ प्राप्तजाहलेंअनायासें ॥ ५६ ॥ सूतह्म
णेशौनकादिकांसी ॥ विधीकथिताझालानारदासी ॥ तीचकथाआह्मींतुह्मांसी ॥ य
थामतीनिवेदिली ॥५७॥ रामाश्रयेंकरूनिजाण॥याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥
केलेंअसेमान्यअसो ॥ ५८ ॥ ॥ इतिश्रीपद्मपुराण उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे

१ आत्मविचारकरणें हेंच विषयसेवन. २ अस्तित्व,चेतनत्व,आणि स्वस्थत्व.हेगुण आत्म्याचेठायीं वास करितात.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ ॐनमोजीपिनाक[1]धरा ॥ स्कंद[2]जनकादाक्षायणीवरा ॥ त्रिपुरनाशकासृष्टिसंहारा ॥ कैलासवासियाजगद्गुरो ॥ १ ॥ नारदह्मणेब्रह्मदेवासी ॥ भीमाशंकराचेअष्टदिशी ॥ तीर्थेंअसतीपरियेसीं ॥ तयांचें चरित्रसांगाहो ॥ २ ॥ तुह्मींबहुततीर्थमहिमेतें ॥ सांगीतलेंतआह्मांतें ॥ मनतृप्त नोहेनिगुते ॥ ह्मणोनिआणखींकथनकरा ॥ ३ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ नार देंकेलेंप्रश्नासी ॥ विधीनेंकथिल्यामहिम्यासी ॥ सांगतोंऐकाएकभावें ॥ ४ ॥ भीमा शंकराचेआसमंतीं ॥ जींजींपावनतीर्थेंअसती ॥ तयांचियामहिमेप्रती ॥ कथनकर ण्याअसमर्थमी ॥ ५ ॥ तुह्मीहीश्रवणकरण्यानसासमर्थ ॥ ह्मणोनीसांगतोंसंक्षेपा र्थ ॥ यांतचीअसेतुमचास्वार्थ ॥ श्रवणकराएकभावें ॥ ६ ॥ भीमाशंकराचेसमीपभा गीं ॥ शंकरतीर्थप्रसिद्धजगीं ॥ स्मरणमात्रेंलागवेगीं[3] ॥ भुक्तिमुक्तिप्राप्तहोई ॥ ७ ॥ त्यातीर्थीस्नानदान ॥ पितरांसिकेलियापिंडार्पण ॥ मुक्तिप्राप्ततेणेंकरून ॥ होईलजा णेंनारदा ॥ ८ ॥ एतद्विषयींआख्यान ॥ नारदातुजसीपुण्यपावन ॥ सांगतोंऐकेंचि त्तदेऊन ॥ सर्वपापनष्टहोई ॥ ९ ॥ ज्यातीर्थाचेस्मरणेंकरून ॥ प्राणिमात्रहोतीपावन ॥ श्रवणकरितांतैसेंचिजाण ॥ स्वर्गस्थहोतीप्राणिमात्र ॥ १० ॥ अवंतीनगरीचियेठाईं ॥ वेदपारगब्राह्मणपाहीं ॥ धनशर्मानामेंविख्यातमही ॥ विष्णुभक्तअसेतो ॥ ११ ॥

---

१ पिनाकनांवाचें धनुष्य. २ कार्तिकस्वामी. ३ तात्काळ.

 

विष्णूचेनामेंकर्मकरी ॥ मानसींध्यानतेंचिधरी ॥ विष्णूवांचूनिअन्यदेवतेवरी ॥ श्रद्धा
त्याचीअसेना ॥ १२ ॥ विष्णूव्रतश्रेष्ठसर्वांत ॥ विष्णुवांचूनिअन्यदैवत ॥ असत्यमा
नसींभांवित ॥ आदरनकरीकदापी ॥ १३ ॥हरिदिनींकरीउपवास ॥ नपूजीकधींशं
करास ॥ नजाईकधींशिवतीर्थास ॥ विष्णूवांचूनिनेणेंकांहीं ॥ १४ ॥ उपवासक
रीएकादशी ॥ नेणेकधींहीअन्यव्रतासी ॥ प्रेमेंजाईविष्णुतीर्थासी ॥ ब्राह्मणअसेए
कनिष्ठ ॥ १५ ॥ जेथेंअसेविष्णुक्षेत्र ॥ तेथेंजातसेविप्रेंद्र ॥ स्वप्नींहीतोभालचंद्र ॥
क्षेत्रवासनकरीच ॥ १६ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ येणेंप्रकारेंत्याब्राह्मणासी ॥
वर्षेंजाहलींएकोनऐंशीं ॥ विष्णुव्रतआचरितां ॥ १७॥ एकदांतोब्राह्मण ॥ करीतअ
सतांपृथ्वीपर्यटन ॥ अकस्मातभीमाशंकरींजाण ॥ प्राप्तहोताजाहला ॥ १८॥ लो
कींउपदेशिलाब्राह्मण ॥ आजीअसेशिवरात्रीदिन ॥ भीमातीर्थींकरावेंस्नान ॥ दर्श
नघ्यावेंशिवाचें ॥ १९ ॥ लोकींबोधिलायेणेंपरी ॥ तथापीनगेलाभीमाशंकरीं ॥ वि
ष्णूवांचूनिमहीवरी ॥ अन्यदेवश्रेष्ठनसे ॥ २० ॥ येणेंपरीकालक्रमित ॥ तोंस्वप्नपा
हिलाअकस्मात ॥ प्राणिप्राप्तअसंख्यात ॥ पिशाचरूपहोऊनियां ॥ २१ ॥ धनश
र्माबोलेतयेकाळीं ॥ तुह्मींकोणअसाबळी ॥ पिशाचरूपेंमहीतळीं ॥ विचरतसांका
यकारण ॥ २२ ॥ पिशाचबोलतीतयासी ॥ तुझेपितरआह्मींपरियेसी ॥ गतीजाह

१ मानित.

लीआह्मांऐशी ॥ ह्मणोनीआलोंतुजजवळी ॥ २३ ॥ धनशर्माबोलेतयांतें ॥ तुह्मीं आचरलेतीतपातें ॥ तथापीपिशाचयोनीतें ॥ प्राप्तकोणेकारणें ॥ २४ ॥ माझेंमनविस्मितहोत ॥ मजसीसांगासर्ववृत्तांत ॥ हेतूअसेश्रवणींबहुत ॥ दयायुक्तहोऊनियां ॥ ॥ २५ ॥ पुत्राश्रवणकरींएकचित्तें ॥ तुजसीसांगतोंकारणातें ॥ आमुच्यापूर्वीलकर्मातें ॥ कथनकरितोंतुजलागीं ॥ २६ ॥ ग्रामसीमातडागोदक ॥ आरामस्थानगुह्यदेख ॥ जेचाळवितीलुब्धक ॥ प्रेतयोनींततेजाती ॥ २७ ॥ कंठपाशयोगेंजाण ॥ विषेंअथवाशस्त्रेंकरून ॥ दावाग्नीमाजीपडून ॥ पंचत्वपावतीपरियेसा ॥ २८ ॥ व्याघ्रादिकमारितीज्यांतें ॥ आत्मघातकरितीहातें ॥ विषूचियोगेंमृतांतें ॥ पिशाचयोनींप्राप्तहोई ॥ २९ ॥ महारोगेंजेमरती ॥ चोरजयांतेंमारिती ॥ मंत्राग्निनसेजयांप्रती ॥ क्रियाकर्मविवर्जित ॥ ३० ॥ वापीकूपतडागादी ॥ आरामस्थानदेवालयादी ॥ पुण्यवृक्षजेअसतीअनादी ॥ पितरांहींसंपादित ॥ ३१ ॥ तयांचाविक्रयंकरूनी ॥ धनमेळवीउदरभरणी ॥ तयांतेंप्राप्तपिशाचयोनी ॥ महाप्रलयपर्यंत ॥ ३२ ॥ जयाप्रेताचाकाष्ठाग्नि ॥ शूद्रस्मशानींनेईजाण ॥ पर्वताहूनिपावूनिपतन ॥ मृत्यूतेंपावतीजेकां ॥ ३३ ॥ आपुल्याकर्मार्जितेंकरून ॥ भूमीवरीनमरतीजेजन ॥ अंतरिक्षांतू

---

१ आश्चर्ययुक्त. २ मोठ्यासरोवरांतीलउदक. ३ विश्रांतिस्थान. ४ विषप्रयोगानें ५ मोडशी. ६ जुनाट. ७ विकून. ८ लांकडें व अग्नी.

निपावोनिपतन ॥ मृत्यूयेईजयांसी ॥ ३४ ॥ शिवविष्णूतेंभेदकरिती ॥ एकथेरए
कलहानह्मणती ॥ इतुकेपावतीऐसीगती ॥ असत्यनोहेकल्पांतीं ॥ ३५ ॥ आह्मींके
लाशिवद्वेष ॥ नाहींकेलेंशिवपूजनास ॥ तैसेंचिशिवरात्रीदिनास ॥ उपोषणहीनके
लें ॥ ३६ ॥ शिवभक्तांचाद्वेषकेला ॥ शिवभक्तिमार्गसोडिला ॥ तेणेंकरूनिआह्मां
ला ॥ ऐशीगतीजाहली ॥ ३७ ॥ तुजसहवर्तमानआह्मांसी ॥ पतनहोईलनरकासी ॥
ऐसेंऐकोनिधनशर्मात्यांसी ॥ बोलताझालातेंऐका ॥ ३८ ॥ नित्यकेलेंविष्णुपूजन ॥
यज्ञतपव्रतदान ॥ संतोषविलामींनारायण ॥ ऐसीगतीमजकांहोईल ॥ ३९ ॥
पिशाचबोलतीतयातें ॥ शिवभक्तिहीननरातें ॥ पूजिल्याप्रेमेंविष्णूतें ॥ ऐसीचग
तीहोईल ॥ ४० ॥ विष्णूअसेशंकररूप ॥ शंकरअसेविष्णुरूप ॥ दोघांचीही
एकरूप ॥ भक्तीकरावीनिश्चयें ॥ ४१ ॥ धनशर्माबोलेतयांसी ॥ तुह्मांहोई
लगतीकैसी ॥ करूंमीकोण्याउपायासी ॥ हेंमजसीनिवेदावें ॥ ४२ ॥ मीअ
सेंजीअज्ञान ॥ मजसीसांगाविस्तारोन ॥ कोण्याउपायेंकरून ॥ उत्तमगतीहोई
लतुह्मां ॥ ४३ ॥ ऐसेंधनशर्माब्राह्मण ॥ बोलतांपिशाचांकारण ॥ पिशाचसांगती
त्यालागून ॥ मुक्तिउपायतेधवां ॥ ४४ ॥ तूंनकरींगयावर्धन ॥ प्रयागयात्रानलगे ॥२॥
जाण ॥ पुष्करयात्रेचेंनाहींकारण ॥ कुरुक्षेत्रींहीनवजावें ॥ ४५ ॥ जाऊंनकोद्वा

१ मुक्ती.

रकापुरीं ॥ कायकारणमथुरानगरीं ॥ प्रेतत्वनाशार्थभीमाशंकरीं ॥ शंकरतीर्थीं जाईंतूं ॥ ४६ ॥ सर्वांतश्रेष्ठशंकरतीर्थ ॥ स्नानकरींप्रेतत्वनिवृत्त्यर्थ ॥ पिंडदानक रितांअर्थ ॥ सर्वहीप्राप्तहोतील ॥ ४७ ॥ पिंडदानकरितांआह्मांसी ॥ गतीहोईलप रियेसी ॥ स्पर्शहोतांशंकरतीर्थासी ॥ कोटिजन्माचींपापेंजाती ॥ ४८ ॥ ब्रह्मदेवसां गेनारदासी ॥ ऐशाऐकोनिप्रेतवचनासी ॥ आनंदवाटलामानसीं ॥ धनशर्माब्राह्म णाच्या ॥ ४९ ॥ तात्काळजावोनिभीमाशंकरीं ॥ शंकरतीर्थदृष्टीभरी ॥ अवलोकि तांचिअंतरीं ॥ आनंदभरितजाहला ॥ ५० ॥ तेथेंकरूनियांस्नान ॥ करीशंकराचें पूजन ॥ नंतरकेलेंपिंडार्पण ॥ धनशर्माब्राह्मणानें ॥ ५१ ॥ येणेंप्रकारेंकरूनिविधि ॥ प्रार्थनाआरंभिलीशुद्धी ॥ ह्मणेहेशंकरादयांबुधी ॥ तुजसीमाझानमस्कार ॥ ५२ ॥ हेशंकरादाक्षायणीवरा ॥ पिशाचत्वप्राप्तमाझ्यापितरां ॥ त्यांणींबोधितांमजस त्वरा ॥ स्नानदानकेलेंयेथें ॥ ५३ ॥ तरीआतांयेककरीं ॥ कृपायुक्तहोऊनिअंतरीं ॥ माझ्यापितरांमुक्तकरीं ॥ प्रेतयोनीपासोनी ॥ ५४ ॥ शंकरबोलिलातयातें ॥ मी असेंप्रसन्नतूतें ॥ तुझेंजेंइच्छितअसेलतें ॥ प्राप्तहोईलतात्काळ ॥ ५५ ॥ तुझ्याभ क्तियोगेंकरून ॥ मुक्तझालेतवपितृगण ॥ विमानामाजीआरूढोन ॥ स्वर्गीजाती पहाकीं ॥ ५६ ॥ ऐसेंऐकोनियांवचन ॥ धनशर्माऊर्ध्वअवलोकन ॥ करीमानसींआ

१ दयेचासागर.

नंदोन ॥ ह्मणेकार्यझालेंमाझें ॥ ५७ ॥ पितरसांगतीपुत्रातें ॥ बातुझ्याप्रसादेंआह्मां
तें ॥ मुक्तीझालीसत्पंथें॥जातसोंआह्मींपहाकीं॥५८॥सूतह्मणेशौनकादिकांसीं॥शंक
रतीर्थाचेमहिमेसी ॥ सांगितलेंविधीनेंनारदासी ॥ तेंचीबोलिलोंयथामती ॥ ५९ ॥रा
माश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तेसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो
॥६० ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रेसूतकथितकथाकल्पतरौशं
करतीर्थवर्णनंधनशर्मापितरोद्धरणंनामएकादशाध्यायगोडहा ॥ ११ ॥ ॥ ॥
॥ ॥ ॥ ओंव्यासंख्या६४१ ॥ ॥ ॥



श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ ॐनमोजीहिमनगजा माता ॥ भस्मासुरवरदाषडास्यताता ॥ जनमनमोहनापार्वतीकांता ॥ भक्तभूषणा महेशा ॥ १ ॥ ब्रह्मदेवसांगेनारदासी ॥ सांगतोंतुजधर्मतीर्थमहिमेसी ॥ श्रवणकरींएकभावेंसी ॥ स्मरणमात्रेंपातकेंजाती॥२॥ज्याचेंकरितांचिदर्शन ॥ पापमुक्तहोती जन ॥ मोहयुक्तजेंसंसारबंधन ॥ नष्टहोईतात्काळ ॥ ३ ॥ धर्मतीर्थासमानतीर्थ ॥ कोठेंहीनाहींजगांत ॥ पूर्वींनझालेंपुढच्याकालांत ॥ ऐसेंदुजेंनहोई ॥ ४ ॥ धर्मतीर्थामाजीजाण ॥ भक्तियुक्तकरितांस्नान ॥ तयानाहींपुन्हाजनन ॥ सत्यजाणनारदा ॥ ५ ॥ गर्भवासतयाप्रती ॥ पुनरपीनहोईकल्पांतीं ॥ प्रसन्नहोईगिरिजापती ॥ स्नानमात्रेंकरूनियां ॥ ६ ॥ इच्छितदेणारींतीर्थें ॥ भूमीवरीअसंख्यातें ॥ यातीर्थासमानयशातें ॥ दुसरेंनसेजाणपां ॥ ७ ॥ सहस्त्रावधीब्रह्महत्या ॥ तैशाचिजाणास्त्रीहत्या ॥ पूर्वजन्मार्जितअसलिया ॥ नष्टहोतीस्नानमात्रें ॥ ८ ॥ अगम्यगमनजरीझालें ॥ घोरपातकजरीकेलें ॥ जेंजेंअसेपापसंचलें ॥ त्याचाविनाशहोतसे ॥ ९ ॥ तेथेंकरूनियांस्नान ॥ जोकरीलपिंडार्पण ॥ भीमाशंकराचेंदर्शन ॥ सर्वपापजातसे ॥ १० ॥ तयाचेबेचाळीसकुळांत ॥ कोणीअसेपापसंपादित ॥ सर्वहीस्नानेंक्षीणहोत ॥ निश्चयधरींमानसीं ॥ ११ ॥ धर्मतीर्थींजयांचीमती ॥ मानसींजेध्यानकरिती ॥ पितरतयां प्रतीदेती ॥ आशीर्वादपरियेसा ॥ १२ ॥ भीमाशंकरींजेनजाती ॥ धर्मतीर्थाचाद्वेष

करिती ॥ तयांसीपितरशापिती ॥ नरकप्राप्तहोऊह्मणोनी ॥ १३ ॥ राहुग्रस्तदिवा
करीं ॥ स्नानेंपुण्यकुरुक्षेत्रीं ॥ त्याचेकोटिगुणितधर्मक्षेत्रीं ॥ तीर्थस्नानेंपुण्यअसे ॥
॥ १४ ॥ परस्त्रियेसीहोईरत ॥ ब्रह्महत्याकरीसतत ॥ गुरुदारगमनींजयाचेंचित्त ॥
परमपापीतोजाणा ॥ १५ ॥ ऐसींपापेंजरीअसती ॥ धर्मतीर्थींधरितांमती ॥ स्नान
मात्रेंनष्टहोती ॥ सत्यसत्यत्रिवाचा ॥ १६ ॥ तेथेंघडलेंजेंचरित ॥ सांगतोंमीतुजप्र
त ॥ श्रवणकरींदेऊनिचित्त ॥ दृढनिश्चयधरोनियां ॥ १७ ॥ जेहेंचरित्रश्रवणकरि
ती ॥ संसारसिंधूंततेनबुडती ॥ स्मरणेंकरूनियांतरती ॥ दृढभक्तीअसावी ॥ १८ ॥
कदंबशिखरहेंनाम ॥ विंध्याचलींअसेद्रुम ॥ हेमराजाचापुत्रहाम ॥ तेथेंवसताजा
हला ॥ १९ ॥ पितानिवर्तल्यावरी ॥ हामराजाराज्यकरी ॥ नगरींअसतीज्यापुरं
ध्री ॥ बलात्कारेंआणीतयां ॥ २० ॥ पौरस्त्रियेंशींअसेकाम ॥ परस्त्रियेवरीअसेप्रे
म ॥ ऐसाराजातोसकाम ॥ राज्यकरीदुष्टबुद्धी ॥ २१ ॥ जयांचेअसतीपतिघरीं ॥
तयांवरीप्रीतीभारी ॥ आणवीतयांबलात्कारीं ॥ कामासक्तहोऊनियां ॥ २२ ॥
साधूजनांतेंदंडीतसे ॥ दंड्यजनांउपेक्षीतसे ॥ परस्त्रियेतेंकामवसे ॥ स्वस्त्रियेतेंप
राङ्मुख ॥ २३ ॥ पूर्वीलहोतेमंत्रीप्रधान ॥ सद्बुद्धीदातेसाधूजन ॥ तयांसीपदच्युं
तकरून ॥ धर्माधिकारीशूद्रकेले ॥ २४ ॥ ब्राह्मणपीडिलेदरिद्रें ॥ परदारबुद्धीराजें

१ गुरुपत्नी. २जिलाजनवरावपुत्रआहेती. ३गांवांतीलस्त्रिया.४कामी.५दंडकरण्यालायोग्य.६योग्यउपदेशक.७अधिकाररहित.

द्रें ॥ ठेविलीअसेमहाक्रूरें ॥ पापीअसेतोदुरात्मा ॥ २५ ॥ स्वप्रजेचानाशकरी ॥
प्रजेसीदिसेकालापरी ॥ ऐसाराजातोदुराचारी ॥ दुर्मार्गानेंवर्ततसे ॥ २६ ॥ ऐसेंअ
सतांएकेकालीं ॥ मृगयाकरण्याबुद्धीझाली ॥ संगेंसेनाघेतली ॥ अरण्यामाजीनि
घाला ॥ २७ ॥ तयेदिनींत्यावनांत ॥ एकहीपशूतयानदिसत ॥ संपूर्णवनधुंडित ॥
पशुवधकराव्याकारणें ॥ २८ ॥ हस्तींधनुष्यधरोनी ॥ अश्वावरीआरूढोनी ॥ आ
कस्मिकफिरतांवनीं ॥ भीमाशंकरींपातला ॥ २९ ॥ प्राप्तहोतांचिभीमाशंकरीं ॥ चा
रीदिशेंसीअवलोकनकरी ॥ शांतजाहलाअंतरीं ॥ सुपल्लववृक्षपाहोनियां ॥ ३० ॥
नानाविधवृक्षअवलोकून ॥ मानसींअत्यंतआनंदोन ॥ ह्मणेहेंकोणतेंअसेस्थान ॥
आनंदवाटेमानसीं ॥ ३१ ॥ सुगंधयुक्तवायूपाहीं ॥ मंदमंदसततवाही ॥ ऐशा
सौम्यउपचारांहीं ॥ राजाशांतजाहला ॥ ३२ ॥ जन्मापासोनजेजेश्रम ॥ जाहले
असतीकरोनिव्यायाम ॥ प्राप्तहोतांतेथेंहाम ॥ श्रमरहितजाहला ॥ ३३ ॥ पुढेंजा
ऊंपाहेराव ॥ तोंकुंठितगतीजाहलाअश्व ॥ विस्मितजाहलाह्मणेभाव ॥ याचाकां
हींकळेना ॥ ३४ ॥ पाहोनियांऐसीस्थिती ॥ उतरलाअश्वाखालती ॥ स्नानकेला
धर्मतीर्थीं ॥ शुद्धमतीजाहला ॥ ३५ ॥ धर्मतीर्थींकारितांस्नान ॥ शुद्धजाहलेंराजा
चेंमन ॥ स्तुतीआपुलीकरोन ॥ धन्यमीह्मणेजगींआजी ॥ ३६ ॥ ब्राह्मणासीबोला
वून ॥ करिताजाहलापिंडदान ॥ मानसींअत्यंतआनंदोन ॥ ह्मणेपितरधन्यमाझे

॥ ३७ ॥ स्नानदानपिंडार्पण ॥ येणेंप्रकारेंकरून ॥ अश्वावरीआरूढोन ॥ जाताझा
लास्वनगरा ॥ ३८ ॥ जावोनियांस्वनगरीं ॥ पूर्वीलअमात्यांपाचारी ॥ नूतनांचाधि
कारकरी ॥ घालविलेराज्यांतूनी ॥ ३९ ॥ साधूजनांसंतोषवी ॥ दुष्टजनांतेंशिक्षा
लावी ॥ ऐसीरीतीआचरीबरवी ॥ सर्वनृपांतश्रेष्ठतो ॥ ४० ॥ परस्त्रियाज्याहोत्यागृ
हीं ॥ त्यासर्वनिरोपिल्यापाहीं ॥ जावोनितुह्मींस्वगेहीं ॥ आपुलेधर्मेंवर्तावें ॥ ४१ ॥
कामबुद्धीनष्टझाली ॥ दुष्टवासनासोडोनिगेली ॥ रायाचीबुद्धीधर्मींजडली ॥ जाहलातो
वीतरागी[1] ॥ ४२ ॥ आपुलेपुत्रालागींतयीं ॥ बैसवोनीस्वराज्यींपाहीं ॥ करोनिनीती
उपदेशाही ॥ आपणनिघालातपार्थ ॥ ४३ ॥ जावोनियांभीमाशंकरीं ॥ एकभावेंत
पकरी ॥ त्यायोगेंत्याचेअंतरीं ॥ समाधानजाहलें ॥ ४४ ॥ पुढेंतयासीउत्तमगती ॥
जाहलीअसेदेहांतीं ॥ याचरित्रश्रवणींधरावीप्रीती ॥ महद्दुःखींतरेतो ॥ ४५ ॥ हेंध
र्मतीर्थाचेंआख्यान ॥ जोकरीशुद्धमतीनेंश्रवण ॥ त्याचेंतुटेलभवबंधन ॥ स्वर्गप्राप्ती
होईल ॥ ४६ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ विधीसांगताजाहलानारदासी ॥ तीचकथा
मींतुह्मांसी ॥ यथामतीनिवेदिली ॥ ४७ ॥ रामाश्रयेंकरोनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥
तैसेंचदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ४८ ॥ इतिश्रीप० उत्तरसं० सूत० धर्मतीर्थम ॥२॥
हिमावर्णनं हामराजाशुद्धमतीकरणंनामद्वादशाध्यायगोडहा ॥ १२ ॥ ओंव्या ६८९ ॥

---

१ विषयप्रीतिरहित.

# अध्याय १३ वा.





श्रीगणेशायनमः॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः॥ ॐनमोजीमंगळधामा ॥भ
क्तजनहृदयआरामा ॥ स्थावरजंगमफलांकितद्रुमा ॥ नामानामातीततूं ॥ १ ॥ इंदि
रावरस्वसामनरंजना ॥ स्कंदजनकामीनकेतनदहना ॥ ब्रह्मानंदाभालचंद्रमा ॥ भ
वखंडनाजगांतका ॥ २ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ पूर्वींकथिलेंधर्मतीर्थमहिमे
सी ॥ पुढेंमृतसंजीवनतीर्थासी ॥ श्रवणकराएकभावें॥३॥ब्रह्मदेवह्मणेनारदातें ॥ऐ
केंमृतसंजीवनमहिमेतें ॥ ज्याच्याकेलियाश्रवणातें ॥ सर्वपापनष्टहोई ॥ ४ ॥ ह्या
तीर्थाचियेठायीं ॥ स्नानकरीजोएकभावेंही ॥ तोयाजगींअखिलमही ॥ माजीअसे
पुण्यवंत ॥ ५ ॥ वृद्धीपावेपुत्रादिसंतती ॥ पापेंसर्वनाशपावती ॥ आयुष्यवर्धनत
याप्रती ॥ होईलजाणानिश्चयें ॥६॥ यातीर्थाचेसन्निधानीं ॥ रसभरितफलेंदानीं॥
अर्पणकरावींएकभावेंकरोनी ॥ गाईंसकोमलतृणद्यावें ॥ ७ ॥ सप्तधान्येंअर्पणक
रावीं ॥ गुडेंवस्त्रगंधमाल्येंबरवीं ॥ ब्राह्मणालागींप्रेमेंद्यावीं ॥ तैसेंचिदुग्धशर्करा ॥
॥८॥ येणेंप्रकारेंसर्वदानें ॥ दीधल्याएकभावानें ॥ त्यासीअखिलसुखप्राप्तजाणें ॥
कृतकृत्यहोईतोनर ॥ ९ ॥ भीमाशंकरासहवर्तमान ॥ जोकरीमहादेवाचेंपूजन ॥
त्याचेंचिजन्मसफलजाण ॥ धन्यजीवनतयाचें ॥१० ॥ जोयातीर्थीस्नानकरी ॥ त
यापुत्रादिसंततीहोईलनिर्धारीं ॥ निर्धनहोईलकुबेरापरी ॥ भवसागरींतरेतो ॥ ११ ॥

१ विष्णूची बहीण. २ गुळ. ३ सर्व. ४जो निर्धन असेल तो कुबेराप्रमाणें धनवान् होईल.

सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ याविषयींपूर्वीलइतिहासासी ॥ श्रवणकराएकभावेंसीं
॥ पुण्यप्राप्तीहोईल ॥ १२ ॥ जनस्थानाचियेठायीं ॥ त्रिलोकानामाराजापाहीं ॥
॥१॥ इंदुमतिनामेंसुस्वरूपही ॥ भार्याहोतीतयाची ॥ १३ ॥ त्याराजाचेराज्यांत ॥ ब्रा ॥१३॥
ह्मणहोताएकशिवभक्त ॥ तयाचीललनागुणवंत ॥ कमललोचनाहोतीपैं ॥ १४ ॥
राजपत्नीआणिब्राह्मणपत्नीचें ॥ सख्यअसेदोघींचें ॥ पतिद्वेषकरणेंसाचें ॥ व्रतअ
सेदोघींसी ॥ १५ ॥ पतींच्यावचनानमानिती ॥ सर्वकालकलहकरिती ॥ ऐसेंवर्त
तांतयांप्रती ॥ मृत्युप्राप्तजाहला ॥ १६ ॥ पूर्वार्जितकर्मेंकरून ॥ राजपत्नीजाहली
मर्कटजाण ॥ पतिद्वेषकेलियाकारण ॥ कुक्कुटझालीद्विजपत्नी ॥ १७ ॥ त्यामर्क
टकुक्कुटदोघीजणी ॥ उत्पन्नजाहल्याजनस्थानीं ॥ पूर्वीलभोक्तृत्वेंकरोनी ॥ दशाऐ
शीपावल्या ॥१८॥ कर्मधर्मसंयोगेंकरून ॥ तयांसीहोईशिवविष्णूदर्शन ॥ ऐसाकांहीं
कालक्रमून ॥ पंचत्वपावल्यादोघीजणी॥१९॥पुढेंत्याकुंकणदेशीं॥जन्मपावल्याभोक्तृ
त्वेंसी॥राज्ञीझालीराजमहिषी ॥ ब्राह्मणीझालीविप्रपत्नी ॥२०॥ जापनामेंराजयाची ॥
पट्टराणीजाहलीसाची॥स्वरूपेंकेवळरतीची॥उपमातीसीपुरेना ॥२१॥ तीब्राह्मणीआ
पुलेपतीसी॥प्रियजाहलीअत्यंतेंसी ॥ त्यादोघांचेसख्यत्वासी ॥ दृष्टांतदुजानसेची ॥१॥
॥२२॥पुढेंकांहींकालेंकरून॥आठपुत्रझालेतिजलागून॥स्वरूपेंअसतीमातेसमान॥ध

१ नाशिक. २ कज्जा. ३ जिलाराज्याभिषेक झाला आहे ती. ४ मदनाच्यास्त्रीची. ५ ब्राह्मणपत्नीलाआठपुत्रझाले.

र्मशीलपित्यासमान ॥ २३ ॥ पुत्रगुणवंतअसतीसाचे ॥ मातेवरीप्रेमत्यांचें ॥ ध्या
नअसेपितृसेवेचें ॥ निरंतरपरियेसा ॥ २४ ॥ त्याजापरायाचीपट्टराणी ॥ भूमिपा
नामतिजलागोनी ॥ पुत्रनहोतीकर्मेंकरोनी ॥ वृद्धत्वप्राप्तजाहलें ॥ २५ ॥ वृद्धत्व
प्राप्तहोतांजाण ॥ पुत्रएकतिजलागोन ॥ जाहलाअसेसगुण ॥ आनंदझालातियेसी
॥ २६ ॥ पूर्वीलसंबंधेंकरून ॥ दोघींचेंसख्यजमलेंजाण ॥ निघाल्यातीर्थयात्रेलागू
न ॥ भीमाशंकरींपातल्या ॥ २७ ॥ स्त्रीसमूहाबरोबरी ॥ येऊनिभीमाशंकरीं ॥ आ
श्चर्यकरितीअंतरीं ॥ स्थानपाहोनींतेथींचें ॥ २८ ॥ त्याराजपत्नीचासुत ॥ रोगिष्ठ
असेअत्यंत ॥ नवमवर्षहोतांप्राप्त ॥ मृत्युप्राप्तजाहला ॥ २९ ॥ राजपत्नीचापुत्रमृ
त ॥ देखोनींब्राह्मणीदुःखित ॥ सखीचेंशांतवनकरूंइच्छित ॥ स्नेहभावेंकरूनियां॥
॥ ३० ॥ मुक्ताभरणेंअसतीकंठीं ॥ स्वरूपेंदिसेसुरेखगोरटी ॥ प्राप्तझालीपाहोनिनि
कटीं ॥ राजपत्नीसंतापे ॥ ३१ ॥ अष्टपुत्रांशींसमवेत ॥ ब्राह्मणीआलीमिरवत ॥
तीतेंराजपत्नीपाहात ॥ क्रोधदृष्टीकरोनियां ॥ ३२ ॥ आपुलापुत्रजाहलामृत ॥ आ
ठपुत्रांहींब्राह्मणीशोभत ॥ मारावेंइच्यापुत्रांप्रत ॥ ऐसाविचारकरितीझाली ॥ ३३॥
बोलोनियांमधुरोत्तरीं ॥ ब्रह्मणीगौरविलीपरोपरी ॥ गृहाप्रतीपाठविलीसत्वरी ॥ मा
नसींमत्सरबहुअसे ॥ ३४ ॥ तात्काळआज्ञापिलेंअनुचरां ॥ जावोनिमाराइच्यापु

---

१ राजपत्नी व ब्राह्मणाची स्त्री यांचें प्रेम जडलें. २ समीप. ३ द्वेषबुद्धी. ४ सेवकांला

त्रां ॥ ऐसेंऐकतांचिसत्वरा ॥ धांविन्नलेराजदूत ॥ ३५ ॥ जावोनियांराजदूतीं ॥ मा
रिलेंआठहीपुत्रांप्रती ॥ पुत्रमृतपाहोनिब्राह्मणसती ॥ शोककरीअनिवार ॥ ३६ ॥
॥ २ ॥ सखीनेंमारविलेआपुलेसुत ॥ जाणोनीमानसींदुःखकरीत ॥ पुढेंकायकरावेंह्मणत॥ 
लोकांविनवीपरोपरी ॥ ३७ ॥ कायम्यांकेलासखीचाअपराध ॥ ह्मणोनीकरविला
पुत्रवध ॥ पुत्रकैसेहोतीसावध ॥ सांगाऐसाउपाय ॥ ३८ ॥ इयेचेंपाहोनियांदुःख॥
लोकांसिकरुणाउपजलीदेख ॥ ह्मणतीअसेउपायएक ॥ विश्वासधरींमानसीं॥३९॥
मृतसंजीवनीतीर्थ ॥ जगामाजीअसेख्यात॥तेथेंजावोनितूंत्वरित॥उदकप्रोक्षांवेंपुत्रां
वरी ॥४०॥ विश्वासेंकरितांआचरण॥कार्यसिद्धीहोईलजाण॥मृतपुत्रांसीजीवन॥तात्का
ळहोईलजाणपां॥४१॥ऐकोनितयांचेंवचन॥ मनींविश्वासधरोनीपूर्ण ॥ मृतसंजीविनी
तीर्थीजावोन॥उदकआणींझडकरी॥४२॥तेंउदकपुत्रांवरी ॥विश्वासधरोनीसेंचनकरी
॥तियेचेआठहीपुत्रसत्वरी ॥ उठोनिवंदितीमातेसी ॥४३॥पाहोनियांहाचमत्कार॥अं
कावरीघेतकुमर ॥ आनंदजाहलाअपार ॥ ब्राह्मणीसीतयेवेळीं ॥ ४४ ॥ हावृत्तां
तश्रवणकरितां ॥ राज्ञीजाहलीआश्चर्ययुक्ता ॥ बोलावूंपाठविलेंदूतां ॥ ब्राह्मणीला
गींसत्वरी ॥ ४५ ॥ बोलावितांसखीअनुचरीं ॥ ब्राह्मणीपातलीसत्वरी ॥ तीतेंबैस ॥ २ ॥
वीउच्चासनावरी ॥ आदरकरीबहुसाल ॥ ४६ ॥ राज्ञीविचारीतियेप्रती ॥ त्यांकव

१ अभिषेक करावा. २ प्रोक्षण करी. ३ राजपत्नी.

ण्याउपायाप्रती ॥ केलेंसिसांगसत्वरगती ॥ मजलागींस्नेहभावें ॥ ४७ ॥ कोणतेंत
पतूंआचरलीस ॥ मृतपुत्रकेलेसीजीवंस ॥ अथवाकोणाचीसेवाबहुवस ॥ केलीस
अससीसांगपां ॥ ४८ ॥ ज्याकोणत्याउपायेंकरून ॥ तुझेपुत्रवांचलेजाण ॥ तोउ
पायमजलागून ॥ सांगेंसत्वरीप्रियसखी ॥ ४९ ॥ ऐकोनिराजपत्नीचेंवचन ॥ म्ह
णेभूमिपेकरींश्रवण ॥ येथेंनामेंमृतसंजीवन ॥ तीर्थअसेपरियेसी ॥ ५० ॥ तेंती
र्थअसेपापनाशन ॥ उदकअसेपुण्यपावन ॥ प्रेतांवरीसेचितांजाण ॥ जितझालेपु
त्रमाझे ॥ ५१ ॥ त्वांहीदृढविश्वासधरोन ॥ मृतसंजीवनीउदकआणून ॥ शवावरी
करींसेचन ॥ तात्काळहोशीपुत्रवती ॥ ५२ ॥ ऐसेंब्राह्मणीचेंवचन ॥ राज्ञीनेंकरू
नीश्रवण ॥ अमृतचिप्राप्तमानून ॥ विश्वासधरिलाअंतरीं ॥ ५३ ॥ जावोनियांत्या
तीर्थी ॥ उदकआणीसत्वरगती ॥ शवावरीसिंचितांत ॥ पुत्रजाहलाजीवंत ॥ ५४ ॥
हापाहोनिचमत्कार ॥ आनंदजाहलानिर्भर ॥ दोघींचेंहीअंतर ॥ विश्वासलेंतीर्थी
त्या ॥ ५५ ॥ पुढेंत्यादोघीजणी ॥ संजीवनीतीर्थीजावोनी ॥ स्नानदानादिआचरोनी
॥ आनंदफारपावल्या ॥ ५६ ॥ येणेंप्रकारेंआचरोन ॥ मानसींसौख्यमानून ॥ आ
पुल्यानगरींजावोन ॥ सौख्येंराहत्याजाहल्या ॥ ५७ ॥ जोकोणीयातीर्थाप्रती ॥ स्नान
दानकरीलअतिप्रीती ॥ इहलोकींभोगूनिअखिलसंपत्ती ॥ अंतींशिवपदाजातसे

१ जीवंत. २ प्रोक्षणकरितांच.

॥ ५८ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ विधीनेंसांगीतलीनारदासी ॥ तीचकथाम्यांतु
झांसी ॥ निवेदिलीयथामती ॥ ५९ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥
तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ६० ॥ इतिश्रीपद्मपुराणेउत्तरसंहितांत
र्गतभीमाचरित्रेसूतकथितकथाकल्पतरौअमृतसंजीविनीमहिमावर्णनंप्रेतसंजीवनंनाम
त्रयोदशाध्यायगोड़ह्या ॥ १३ ॥ ॥ ॥ ॥
॥ ॥ ॥ ॥ ओंव्या संख्या ॥ ७४९ ॥ ॥ ॥ ॥





श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीउमाशंकराभ्यांनमः ॥ पार्वतीरमणायनमः ॥ ॐनमोजीपुराणपुरुषा ॥ रामध्यानातांडवविलासा ॥ जगद्वंद्याहृषीकेशा ॥ अनादिअनंतअससीतूं ॥१॥ शौनकादिकसर्वऋषी ॥ प्रश्नकरितीसूतासी ॥ सांगावेंपुढीलकथेसी ॥ तृप्तिनोहेआमुची ॥ २ ॥ नारदह्मणेविधीतें ॥ सांगेंपुढीलचरित्रातें ॥ तृप्तीनोहेमानसातें ॥ कितीहीश्रवणकेलिया ॥ ३ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ सूतसांगेशौनकादिकांसी ॥ भैरवतीर्थमहिमेसी ॥ श्रवणकराएकभावें ॥ ४ ॥ तीर्थअसेपुण्यपावन ॥ महत्पापाचेंनाशकजाण ॥ ज्यांबहुविधतीर्थेंकेलींकथन ॥ तरीयासमअन्यनाहीं ॥ ५ ॥ ब्रह्महत्येसमानपातकें ॥ नष्टहोतीलस्नानेंएकें ॥ भजनपूजनकरितांनिकें ॥ महत्पापेंनष्टहोती ॥ ६ ॥ याविषयींआख्यान ॥ नारदासांगतोंकरींश्रवण ॥ मननहीकेलियाभक्तीन ॥ जन्मसंसारबंधतुटे ॥७॥ पूर्वीविजयांनगरीमधीं ॥ कृतयुगाचियेसंधी ॥ विजयीनामकराजासुधी ॥ शूरअसताजाहला ॥ ८ ॥ यथान्यायेंकरूनिजाण ॥ करीपृथ्वीचेंपालन ॥ दुष्टजनातेंदंडकरून ॥ यथान्यायेंराज्यकरी ॥ ९ ॥ येणेंप्रकारेंराज्यकरितां ॥ बुद्धीउपजलीनृपनाथा ॥ मृगयाकारणेंह्मणोनीतत्वतां ॥ निघताझालावनासी ॥ १० ॥ जातअसतांमहावनीं ॥ श्वापदनमिळेराजालागोनी ॥ ह्मणोनीखेदवाटतमनीं ॥ तोंसूर्यगे

१ एका गांवाचें नांव. २ मृगयेविषयीं बुद्धी झाली.

 लाअस्तासी ॥ ११ ॥ ऐशात्यावनामाझारी ॥ ऋषीचाआश्रमहोताथोरी ॥ कार्यसं 
बंधेंआश्रमाबाहेरी ॥ ऋषीआलापरियेसा ॥ १२ ॥ अर्धरात्रझालीअसतां ॥ ऋ
 षीचाश्वासोच्छ्वासतत्वतां ॥ राजयानेंश्रवणकरितां ॥ श्वापदाभासजाहला ॥ १३ ॥ 
॥ श्वापदचिभाऊनिअंतरीं ॥ बाणधनुष्यालावीसत्वरी ॥ सोडितांऋषीचेशरीरीं ॥
येवोनियांलागला ॥ १४ ॥ त्याबाणयोगेंकरून ॥ ऋषीपंचत्वेंपावलाजाण ॥ राजा
आलाशोधीतस्थान ॥ मृगकोठेंपडियेला ॥ १५ ॥ दृष्टीनेंजोंअवलोकित ॥ तोंदेखि
लेंऋषिप्रेत ॥ ब्रह्महत्याझालीह्मणत ॥ धिक्कारअसोमजलागीं ॥ १६ ॥ दुःखवाट
लेंअंतरीं ॥ येताझालाआपुलेनगरीं ॥ तद्दोषनिवारणार्थप्रतिक्षेत्रीं ॥ तीर्थयात्राक
रीतसे ॥ १७ ॥ जेथेंजेथेंजातसेनृप ॥ मागूनिब्रह्महत्याघोररूप ॥ येतसेनिरंतरस
मीप ॥ पाहोनिराजादुःखकरी ॥१८॥ नानातीर्थंनानाव्रतें ॥ राजाआचरीआपुलेमतें ॥
तथापीब्रह्महत्येतें ॥ निरासनोहेकवणेपरी ॥१९॥ येणेंपरीबहूकष्टत ॥ राजाबैसला
असतांअरण्यांत ॥ अंबरीषऋषीजाहलाप्राप्त ॥ शिष्यगणांसहजाणा ॥२०॥ नृपेंऋषी
तेंअवलोकून ॥ साष्टांगकरूनियांनमन ॥ उच्चासनींबैसवून ॥ पूजाकरीयथाविधी ॥२१
पुनःपुन्हानमनकरी ॥ ह्मणेस्वामीत्रासलोंभारी ॥ दानव्रतेंपरोपरी ॥ केलींनिवारणा 
र्थब्रह्महत्येच्या ॥ २२ ॥ तीर्थयात्राकेल्याफार ॥ धुंडिलीम्यांपृथ्वीसमग्र ॥ ब्रह्मह

---

१ व्याघ्रादिक कोणीतरी. २ मृत्यु.

त्यानोहेदूर ॥ कोणत्याहीउपायें ॥२३॥ नानाविधनदींचेंस्नान ॥ केलेंअसेम्यांदृढभ
क्तीन ॥ कांहींकालफलाहारकरोन ॥ घालविलापरियेसा ॥ २४ ॥ अखिलमंत्रां
चाकेलाजप ॥ व्रतेंआचरलोंअमूप ॥ तथापीब्रह्महत्येचेंपाप ॥ निवारणहोतनाहीं॥
॥ २५ ॥ तरीआतांतुह्मींमजसी ॥ उपायसांगापापनिवृत्तीसी ॥ मीआहेंशरणतुह्मां
सी ॥ स्वामीमातेंउद्धरा ॥ २६ ॥ अंबरीषमुनीबोलेत्यासी ॥ राजातूंधन्यआहेसी॥
सोडींपापाचेभीतीसी ॥ उपायसांगतोंतुजलागीं ॥ २७ ॥ डाकिनीक्षेत्रअसेजाण ॥
त्रिभुवनामाजीपरमपावन ॥ स्नानमात्रेंकरीपावन ॥ पापिष्ठनरापरियेसा ॥ २८ ॥
तयेस्थानींतूंजाऊन ॥ स्नानदानकरींभक्तीन ॥ ब्रह्महत्येचेंनिरसन ॥ होईलतात्का
ळजाणपां ॥ २९ ॥ ऐसेंऐकोनिवचन ॥ डाकिनीक्षेत्रींराजाजावोन ॥ करीभैवरती
र्थीस्नान ॥ विश्वासयुक्तहोऊनियां ॥ ३० ॥ भीमाशंकराचेंदर्शन ॥ घेतांबहुतआव
डीन ॥ ब्रह्महत्यापळालीभिऊन ॥ राजाशुद्धजाहला ॥ ३१ ॥ जयातेंप्रसन्नपिना
की ॥ तोसुखभोगीयालोकीं ॥ अंतींजातसेशिवलोकीं ॥ अक्षयवासहोयतेथें॥३२॥
सौख्यभोगोनियालोकीं ॥ अंतींप्राप्तीशिवलोकीं ॥ तीकथाशौनकादिकीं ॥ श्रवण
केलीअत्यादरें ॥ ३३ ॥ सूतह्मणेशौनकदिकांसी ॥ ब्रह्मनारदसंवादासी ॥ सांगीत
लेंमीतुह्मांसी ॥ यथामतीपरियेसा ॥ ३४ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंले

१ सर्व. २ पाप नाहींसें होण्याला उपाय.

खन ॥ तैसेंचदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ३५ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तर
संहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ भैरवतीर्थमहिमावर्णनंब्रह्महत्या
नाशनंनामचतुर्दशाध्यायगोडहा ॥ १४ ॥ ॥ ओ०यासंख्या ॥ ७८० ॥





श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीउमामहेश्वराभ्यांनमः ॥ ॐनमोजीगंगा
धरानागभूषणा ॥ सर्वव्यापकात्रिपुरमर्दना ॥ सर्वातीतानिरंजना ॥ गुणत्रयविरहि
ता॥ १ ॥ माधवभगिनीमनरंजना ॥ स्कंदतातामीनकेतुदहना ॥ आनंदकंदात्रिलोच
ना ॥ भवभंजनाअंधकांतका ॥ २ ॥ सूतह्मणेशौनकादिकांतें ॥ विधीसांगताझाला
नारदातें ॥ सांगतोंतुह्मांत्याचिकथेतें ॥ एकचित्तेंपरिसाहो ॥ ३ ॥ ब्रह्मदेवह्मणेना
रदा ॥ ऐकेंत्रिशूलतीर्थमहिमापुण्यदा ॥ याचेसमाननसेगोदा ॥ सर्वांतउत्तमअसेहें
॥४॥ यथाविधीकरूनिजाण ॥ त्रिशूलतीर्थीकरीस्नान ॥ तयासिमुक्तीतत्क्षण ॥ प्रा
प्तहोईअनायासें ॥ ५ ॥ जोदानदेईउत्तम ॥ तयासीनाहींपुनर्जन्म ॥ पापमुक्तहोऊ
निनाम ॥ वंद्यत्याचेंजगामाजी ॥ ६ ॥ संसारआहेशूलापरी ॥ लोकांपीडाहोतसे
भारी ॥ स्नानकरितांचिसत्वरी ॥ शूलतीर्थनष्टकरी ॥ ७ ॥ संसारशूलेंजेपीडती ॥
करितांस्नानशूलतीर्थी ॥ त्यांतूनतात्काळमुक्तहोती ॥ संसारव्यथानबाधेत्यां ॥ ८॥
एतद्विषयींआख्यान ॥ नारदाऐकेंचित्तदेऊन ॥ श्रवणमात्रेंपापसंपूर्ण ॥ नष्टहोईल
तात्काळ ॥ ९ ॥ पूर्वीकृतयुगाचेठायीं ॥ दामुकनामेंलुब्धकपाहीं ॥ चौरकर्मीरतस
दाही ॥ परद्रव्यहरणकरीतसे ॥ १० ॥ परस्त्रीहरणकरीसर्वदा ॥ नित्यकरीतसा
धुनिंदा ॥ प्राणीमात्रांतेंआपदा ॥ देतअसेनिरंतर ॥ ११ ॥ तयानेंपापेंकेलींअनेक॥

१ कोणालाही न सांपडणारा. २ सत्व, रज, तम, या तीनहीगुणांहून वेगळा. ३ पार्वती. ४ संसारव्यथेचानाशकरी.

 त्यातेंसंख्यानसेदेख ॥ सूतह्मणेअहोशौनकादिक ॥ ऐसापापीदुर्मिळ ॥१२॥ तोलुब्ध 
कएकेकाळीं ॥ फिरतअसतांभूमंडळीं ॥ विष्णुराजाचेनगराजवळी ॥ द्रव्यहरणा
 र्थपातला ॥ १३ ॥ नगरवासीजनसंपन्न ॥ धनधान्येंकरूनीजाण ॥ ऐसात्यानगरीं 
तत्क्षण ॥ प्रवेशलालुब्धकतो ॥१४॥ तेथेंहोतेंएकउपवन ॥ त्यांतहोतेंशिवभुवन ॥
सुवर्णकमलांहींकरून ॥ लिंगपूजनकेलेंहोतें ॥ १५ ॥ त्याशिवमंदिराचेआंत ॥
लुब्धकजातसेपाहत ॥ लिंगदेखिलेंअद्भुत ॥ स्वर्णकमलेंअसंख्यअसती ॥ १६ ॥
देखोनियांतींकमलें ॥ तयाचेंचित्तआनंदलें ॥ आंतजावोनीपाहिलें ॥ तोंब्राह्मणएक
बसलाअसे ॥ १७ ॥ शांतदांतउदारमुनी ॥ दृष्टीलाविलीशिवचरणीं ॥ ऐसेंदेखो
नियांनयनीं ॥ ह्मणेरक्षकअसेलहा ॥ १८ ॥ ऐसेंजाणोनियांमानसीं ॥ हातघातला
त्याचेकंठासी ॥ चरणठेविलावक्षस्थलासी ॥ प्राणहरणकरूंपाहे ॥ १९ ॥ तोंब्राह्म
णबोलिलातयातें ॥ कांतूंव्यर्थमारिसीमातें ॥ कायम्यांकेलेंतवापराधातें ॥ बोलेंलु
ब्धकासत्वरी ॥ २० ॥ ऐसेंऐकतांब्राह्मणवचन ॥ लुब्धकमानसींभ्यालापूर्ण ॥ बो
लिलात्यामुनीकारण ॥ क्षमाकरावीमजसी ॥ २१ ॥ ऋषीच्याशब्दश्रवणेंकरून ॥
तैसाचिदर्शनप्रभावान ॥ तयाचीबुद्धीपालटून ॥ चौर्यबुद्धीनष्टझाली ॥ २२ ॥ लुब्ध 
कबोलिलाब्राह्मणासी ॥ चौर्यवृत्तीअसेमसीं ॥ मींकेलियापापासी ॥ सीमानसेपरि
येसा ॥ २३ ॥ ऐसातयासीअनुताप ॥ जाहलाअसेआपेंआप ॥ ऋषीतेंबोलेमाय

त्वरी ॥ शरणआलेपितामहा ॥ ४५ ॥ ब्रह्माबाहेरआलातेक्षणीं ॥ तोंसर्वहीसांग
तीगार्‍हाणीं ॥ दशकंठेंयज्ञटाकिलेमोडोनी ॥ सत्कर्ममहीवरीनचाले ॥ ४६ ॥ एक
सांगतीऋषीश्वर ॥ आमुच्यास्त्रियासमग्र ॥ कुंभकर्णेंनेल्यादुर्धर ॥ अनर्थमांडिला
विधात्या ॥ ४७ ॥ देवआणीपुरंदर ॥ बंदींतपडलेसमग्र ॥ कोणासहीनाटोपेदशकं
धर ॥ विचारकोणताकरावा ॥ ४८ ॥ मगदेवआणिऋषीगण ॥ बरोबरीघेऊनिविष्णु
नंदन ॥ क्षीरसागरासीयेऊन ॥ अपारस्तवनमांडिलें ॥ ४९ ॥ शेषशाईनारायण ॥ को
टिसूर्यप्रभापूर्ण ॥ साठसहस्रयोजन ॥ शेषशयनींशोभतो ॥ ५० ॥ ऐलतीरींदेवसकळी ॥
उभेठाकलेबद्धांजुली ॥ ह्मणतीपूर्णब्रह्मवनमाळी ॥ भक्तपाळकासर्वेशा ॥ ५१ ॥
रावणकुंभकर्णादीअसुर ॥ त्यांहींत्रिभुवनपीडिलेंसमग्र ॥ भक्तकैवारीतूंईश्वर ॥ र
क्षींसत्वरदासांतें ॥ ५२ ॥ तोंक्षीरसागरींहुनीअकस्मात ॥ ध्वनीउठलाअसेअद्भुत ॥
सूर्यवंशींराजादशरथ ॥ तेथेंअवतारघेईनमी ॥ ५३ ॥ शेषहोईललक्ष्मण ॥ भरत
होईलपांचजन्य ॥ शत्रुघ्नहोईलसुदर्शन ॥ अवतारपूर्णहेमाझे ॥ ५४ ॥ विदेहीजन
कपृथ्वीवरी ॥ कमलजाजन्मेलत्याचेउदरीं ॥ तुह्मींसर्वदेवींएकेअवसरीं ॥ वानर
रूपेंअवतारघ्या ॥ ५५ ॥ इकडेअयोध्येंतराजादशरथ ॥ तयासीनहोईसुत ॥ ह्मणो
नीपुत्रकामेष्टीकरवित ॥ ऋष्यशृंगापासोनी ॥ ५६ ॥ त्यायज्ञकुंडापासोन ॥ हातीं

१ ब्रह्मदेव. २ हात जोडून. ३ विष्णूच्या हस्तांतील शंख. ४ देह युक्तअसून देहरहित असा. ५ पुत्र होण्यांसाठींयज्ञ

पायसताटघेवोन ॥ शृंगऋषीपार्शीदेतकृशान ॥ ह्मणेद्याहोतिघींतें ॥ ५७ ॥ बहुतत्व
रांकरायेक्षणीं ॥ विलंबहोतांकार्यहानी ॥ उदरायेईलमोक्षदानीं ॥ क्षीरसागरवासी
॥ ३ ॥ जो ॥ ५८ ॥ ऐसेंबोलोनितयेकाळीं ॥ अदृश्यजाहलाज्वालामाली ॥ शृंगऋषीनें ॥२८॥
वसिष्ठाजवळी ॥ पायसपात्रदीधलें ॥ ५९ ॥ वसिष्ठेंकरूनीविभाग ॥ राणियांतेंदेत
सवेग ॥ कौसल्येसीश्रेष्ठभाग ॥ देतांक्रोधआलाकनिष्ठेतें ॥ ६० ॥ तोह्मणेमीराया
सिप्रियकर ॥ रथचंक्रपडतांघालोनिकर ॥ रणींजयीकेलान्रृपवर ॥ इंद्रादिदेवसाक्ष
असती ॥ ६१ ॥ मजआधींनदेतांमान ॥ कायभागमागुनकरावा ॥ ह्मणोनीकैकेयी
रुसोन ॥ अधोवदनबैसली ॥ ६२ ॥ करीचापिंडनेतघारी ॥ हाहाकारझालातेअव
सरीं ॥ कैकेयीपडेधरणीवरी ॥ आक्रंदततेधवां ॥ ६३ ॥ ऐसेंपाहतांतत्क्षणीं ॥ कौस
ल्यासुमित्रादोघीजणी ॥ पिंडाचेंअर्धअर्धकैकेयीलागुनी ॥ देत्याजाहल्यासंतोषें ६४॥
वसिष्ठऋषितीर्थदेत ॥ त्यासर्वेपिंडप्राशनकरित ॥ कैकेयीच्याकंठींअडकत ॥ कासा
वीसतेझाली ॥ ६५ ॥ वरीवसिष्ठेंशिंपितांतीर्थ ॥ अंतरींपिंडप्रवेशकरित ॥ आनंद
युक्तदशरथ ॥ दानेंदेतअपार ॥ ६६ ॥ घारीनेंजोपिंडनेला ॥ तोअंजनीसीप्राप्तझा

१ क्षीर. २ अग्नी. ३ जलदी. ४ मोक्ष देणारा. ५ कौसल्येला पूर्वी पिंड दिल्यामुळें कैकयीला रागआला. ६ वृषपर्व्यां च्या युद्धांत, दशरथाच्या चक्रांतील लोहदंड मोडला तेव्हां कैकयीनें हात घालून रथ सांभाळिला होता. ७ खालीं मुख करून ८ कौसल्येनें आपल्या पिंडांतलि अर्धा व सुमित्रेनें आपल्या पिंडातील अर्धा असा दोघींनीं कैकेयीला अर्पण केला ह्मणून तिचा पूर्णपिंड झाला.

ला ॥ शंकरें वरहोतादिधला ॥ रुद्रअंशेंपुत्रहोईल ॥ ६७ ॥ ऋषिपत्न्यापाहतीतये
वेळां ॥ बलयुक्ततोपुत्रजन्मला ॥ कींवासरमणीउगवला ॥ वानररूपेंदेदीप्य ॥ ६८ ॥
रुदनकरीक्षुधितबाळ ॥ तोंआरक्तदिसेसूर्यमंडळ ॥ ह्मणेभक्षणायोग्यफळ ॥ उड्डा
णकरीधरावया ॥ ६९ ॥ तेधवांइंद्रेंवज्रपात ॥ मुखावरीताडिलाहनुमंत ॥ तेणेंमू
र्छादाटलीबहुत ॥ पडेवायुसुतपृथ्वीवरी ॥ ७० ॥ तेथेंप्राप्तहोवोनिपवन ॥ बाळा
सिपाहतांकरीरुदन ॥ तेधवांब्रह्मादिकदेवजाण ॥ वज्रदेहीसुतअसोह्मणती ॥ ७१ ॥
पूर्णपिंडाचाहनुमंत ॥ यासीकल्पांतींहीनसेमृत्य ॥ चिरंजीवतुझासुत ॥ ब्रह्मदेवसां
गेवायूसी ॥ ७२ ॥ मगबोलेपिनाकधर ॥ माझेतृतीयनेत्रींचावैश्वानर ॥ सर्वजा
ळीलचराचर ॥ परीतुझ्यासुताभयनसे ॥ ७३ ॥ हनुवटीसलागलेंवज्र ॥ यासीहनु
मंतनामसाचार ॥ धनदसांगेबहुतअसुर ॥ क्षयपावतीयाच्याहस्तें ॥ ७४ ॥ इक
डेराजादशरथ ॥ राणियांसीडोहळेपुसत ॥ जावोनीकैकेयीमंदिरांत ॥ प्रश्नकरी
तियेसी ॥ ७५ ॥ ह्मणेकैकेयीबोलेंवचन ॥ तुजकायआवडेमनांतून ॥ तीह्म
णेकौसल्यासुमित्रापुत्रकानन ॥ निरंतरसेवोत ॥ ७६ ॥ ऐसेंऐकतांउत्तर ॥ दुःखित
झालानृपवर ॥ मगसुमित्रेचेंमंदिर ॥ प्रवेशतापैंझाला ॥ ७७ ॥ नृपतीआलाऐक

१ नरजन्म धारण केल्याप्रमाणें बालभावानें रडूं लागला. २ सूर्याला भक्षण करील असें वाटून इंद्रानें वज्र मारिलें. ३ वायूचा पुत्र मारुती व्याकुळ होऊन खालीं पडल्यामुळें वायू तेथें येऊन बसला, त्यामुळें सर्वदेव तेथें प्राप्त होऊन वायूला वर देऊं लागले. ४ ब्रह्मादिक देवांनीं तुझा पुत्र वज्रदेही होईल असा वर दिला. ५ शंकर. ६ कुबेर.

भी.मा. तांकर्णीं ॥ मस्तकठेवीजावोनिचरणीं ॥ राजाह्मणेतिजलागोनी ॥ कायडोहळेहोती अ०
तुज ॥७८॥ तेह्मणेहेचिआवडीबहुवस ॥ कौसल्यागर्भींअवतरेलआदिपुरुष ॥ त्या
॥४॥ चीसेवामत्पुत्रास ॥ घडोचिरकालऐसेंवाटे ॥ ७९ ॥ तथास्तुह्मणोनीनृपवर ॥ प्रवे ॥२८॥
शलाकौसल्येचेंमंदिर ॥ तोंतेथेंदिसेविचित्रचरित्र ॥ कौसल्येचेंतेधवां ॥ ८० ॥ रा
जातेथेंउभाजावोन ॥ तरीतेनउघडीनयन ॥ नाहींतियेसीस्त्रीपुरुषत्वभान ॥ आनं
दघनविस्तारला ॥ ८१ ॥ नृपह्मणेमहाभूतेंझडपिली ॥ वोळखीसर्वविसरली ॥
मगपुसेगोष्टमागली ॥ धाकुटपणींचीतियेसी ॥ ८२ ॥ राजाह्मणेचंद्रवदने ॥ गुण
सरितेपद्मनयने ॥ वऱ्हाडबुडवेनिरावणें ॥ नेलेंहोतेंआठवेकीं ॥ ८३ ॥ शत्रूचेंना
मपडतांश्रवणीं ॥ हाकफोडीभुजाठोकोनी ॥ ह्मणेधनुष्यबाणद्याहोआणोनी ॥ राव
णासीवधितोंआतां ॥ ८४ ॥ वसिष्ठआलाधांवोन ॥ राजादृढधरीचरण ॥ कौसल्ये
सारिखेंनिधान ॥ भूतेंपूर्णग्रासिलेंह्मणे ॥ ८५ ॥ वसिष्ठयेवोनिकौसल्येजवळी ॥ अ
वलोकिताझालातेवेळीं ॥ तंवतीश्रीरामरूपजाहली ॥ अंतर्बाह्यसमूळ ॥ ८६ ॥
नदिसेस्त्रियेचीआकृती ॥ धनुष्यबाणशोभतीहातीं ॥ आकर्णनयनविराजती ॥ देखे
मूर्तीजगद्वंद्य ॥ ८७ ॥ पाहतांस्वरूपआनंदघन ॥ सद्गदजाहलाब्रह्मनंदन ॥ अष्ट ॥४॥

१ दशरथ पुष्कळ वेळ उभा राहिला तथापि कौसल्या बोलेना ह्मणून ओळख विसरली हा निश्चय केला. २ दशरथाचा आणि कौसल्येचा विवाह झाला तेव्हां दोघां सही रावणानें समुद्रांत बुडविलें होतें. ३ असी कौसल्येची स्थिती पाहून राजा नें वसिष्ठाकडे दूत पाठविले ह्मणून वसिष्ठ आला. ४ सर्वांनीं नमस्कार करण्यास योग्य. ५ वसिष्ठ.

भावेंदाटलापूर्ण ॥ गेलाविसरूनदेहभाव ॥ ८८ ॥ ऐसेंनृपेंअवलोकून ॥ मानसींझा
लाउद्विग्न ॥ ह्मणेआमुतेंपुत्रसंतान ॥ होईलकैचेंअभाग्यां ॥ ८९ ॥ मगहांसेलाब्र
ह्मनंदन ॥ गर्जोनीबोलताझालावचन ॥ जोनीलग्रीवहृदयरत्न ॥ उदरायेतसेतुझ्या
कीं ॥९०॥ असोतेकौसल्यासती ॥ बैसलीअसतांएकांतीं ॥ तोंआठवर्षांचीमूर्ती ॥
उभीदेखेसन्मुख ॥ ९१ ॥ कौस्तुभतेजअपार ॥ पाहतांभुलतीशशीमित्र ॥ गुणींओ
विलींनक्षत्रेंसमग्र ॥ मुक्ताहारडोलती ॥ ९२ ॥ मेघश्यामवर्णकोमळ ॥ कौसल्येपु
ढेंजाहलाबाळ ॥ तंवतेपरमसुवेळ ॥ पुष्यार्कयोगतेसमयीं ॥९३॥ पुत्रजाहलाकौस
ल्येस ॥ लागलावाद्यांचाघोष ॥ सुरांसहितसुरेश ॥ जयजयकारकरितीनभीं॥९४॥
श्रीरामाचेंजातक ॥ करीतेव्हांनृपनायक॥गाईभूमीरत्नेंअसंख्य॥देताजाहलायाच
कां॥ ९५ ॥ तोंसुमित्रेसीजाहलापुत्र ॥ ह्मणोनीधांवतआलेविप्र ॥ क्षीराब्धीऊनीभो
गींद्र ॥ सुमित्रेउदरींजन्मला ॥ ९६ ॥ सुमित्रास्वप्नदेखत ॥ मजसींजाहलासुलक्षण
सुत ॥ सावधहोवोनीपाहत ॥ तोंपुढेंबाळखेळतसे ॥ ९७ ॥ कैकयीसझालेदोनपु
त्र ॥ तेविष्णूचेशंखचक्र ॥ कैकेयीसअसतांनिद्राभर ॥ प्राप्तझालेतेस्थानीं ॥ ९८ ॥
कैकेयीपाहेपुत्रमुख ॥ तोंरवीआणीमृगांक ॥ तेंवीदोघेखेळतीबाळक ॥ देखतांसौ

१ संतती. २ आपण अभाग्य असें वाटून दशरथाला खेद वाटला ह्मणून वसिष्ठाला हास्य आलें याचें कारण प्रत्यक्ष विष्णु दशरथाच्या उदरीं जन्म घेत आहे हें वसिष्ठाला माहीत होतें. ३ मोठें स्वरूप असलें तर कौसल्येचा पुत्र नव्हे असें लोक ह्मणतील ह्मणून लहान स्वरूप धारण केलें.

ख्यवाटलें ॥ ९९ ॥ पुढेंदशरथाचेसुत ॥ एकामागेंएकरांगत ॥ परस्परेंहातधरून
चालत ॥ बालभावेंकरोनियां ॥ १०० ॥ चौघांचेंमुखप्रक्षालुनियां ॥ कौसल्याब
॥ ५ ॥ सवीभोजनकरावया ॥ शांतंहोयदशरथाचीकाया ॥ पुत्रमुखअवलोकितां ॥ १ ॥ ॥२८॥
श्रीरामआणीलक्ष्मण ॥ सोडितीबाणापाठींबाण ॥ त्यामागेंभरतशत्रुघ्न ॥ भेदिती
संधानतैसेंची ॥ २ ॥ दुरूनपाहेदशरथवीर ॥ चौघेएकदांचटाकितीशर ॥ दैत्यप्रति
माकरूनिथोर ॥ त्यांचीशिरेंउडविती ॥ ३ ॥ याचिप्रकारेंतिघेबंधू ॥ महावीरनिष्का
मसाधू ॥ रामसेवाकरितांआनंदू ॥ तिघांसहीसर्वदा ॥ ४ ॥ तंवतोअकस्मातविश्वा
मित्र ॥ राजसभेयेवोनिसत्वर ॥ ह्मणेयागरक्षणश्रीरामचंद्र ॥ आज्ञापींगादशरथा ॥
॥ ५ ॥ दशरथाचेआज्ञेवरून ॥ ताटिकेचांवधकरून ॥ विश्वामित्रयागरक्षण ॥ क
रूनिनिघालाजनकगृहीं ॥ ६ ॥ मार्गीअहिल्येचेंउद्धरण ॥ करूनिरामचंद्रआनंदघ
न ॥ विश्वामित्रसहवर्तमान ॥ जनकगृहींपातला ॥ ७ ॥ तेथेंधनुष्यभंगकरोनी ॥
जानकीतेंवरीकैवल्यदानीं ॥ हेंवर्तमानदशरथालागोनी ॥ अयोध्येंतसमजलें ॥८॥
दळभारसिद्धकरित ॥ जावयानिघेत्वरित ॥ निशाणींघावघालित ॥ भरतशत्रुघ्नही ॥ ५ ॥

१ पुष्कळ दिवस पर्यंत दशरथाला संतती नसून एकदम चार पुत्र भोजनाला बसलेले पाहून दशरथाला आनंद झाला. २ विश्वामित्रानें यागरक्षणाविषयीं रामचंद्राची याचना केली. ३ विश्वामित्राचे आश्रमीं जातांना ताटिकेचा वध केला. ४ विश्वामित्राच्या यागरक्षणकालीं मारीच व सुबाहु यांस रामानें शिक्षा केली. ५ पुढें जनकमंदिरीं जातांना अहल्येचा उद्धार केला. ६ जनकसभेंत शैवचापाचा भंग केला. ७ जनकानें अयोध्येंत दूत पाठविले आणि रामाचा वृत्तांत कळविला.

निघाले ॥ ९ ॥ कौसल्यासुमित्राकैकेयीराणी ॥ निघाल्याआरूढोनीसुखासनीं ॥ दूतकंनकवेत्रपाणी ॥ सहस्रावधीधांवतीपुढें ॥११० ॥ सातशतेंदशरथयुवती ॥ त्या हीरामविवाहपाहावयानिघती ॥ सुखासनींबैसोनिजाती ॥ अनुक्रमेंकरोनियां॥११॥ पुढेंदिसतसेविदेहीनगर ॥ ऐकोंयेतअनुहतगजर ॥ ससैन्यजनकनृपवर ॥ सामोरा येदशरथा ॥ १२ ॥ जनकेंपूजोनिचवघेवर ॥ अश्वांवरीबैसविलेसत्वर ॥ पुढेंहोत वाद्यांचागजर ॥ गगनींसुरवरगर्जती ॥१३॥ मिरवतआलेचवघेजण ॥ मणिमयचव रंगसमसमान ॥ मधुपर्कविधिपूजन ॥ यथासांगकरीनृप ॥ १४॥ चौघीकन्याआणि ल्याबाहेरी ॥ गौरवोनिवस्त्रालंकारीं ॥ स्नुषादेखोनितेअवसरीं ॥ आनंदयुक्तदशरथ ॥ ॥ १५ ॥ मंगळाष्टकेंह्मणतीब्राह्मण ॥ लग्नघटिकाभरलीपूर्ण ॥ ॐपुण्यांहआचार्येंह्मणो न ॥ अंतःपटकाढिला ॥ १६ ॥ सीतेनेंवरिलारघुनंदन ॥ उर्मिलेनेंवरिलालक्ष्मण ॥ मा लतीनेंभरतनिधान ॥ श्रुतकीर्तिनेंशत्रुघ्नवरिला ॥१७॥ चारीदिवसपर्यंत ॥ जनकनग रींसोहळेहोत ॥ मगअयोध्येसीजावयानिघत ॥ दशरथपुत्रांसमवेत ॥ १८॥ विवाहपा होनीनारदऋषी ॥ वेगेंगेलाबदरिकाश्रमासी ॥ देखोनितेथेंपरशुरामासी ॥ ह्मणेबसला सीकायस्वस्थ ॥ १९ ॥ तुझेंधनूमोडीदशरथकुमर ॥ ऐकतांबोलेजमदग्नीपुत्र ॥ आमुचें अवतारकृत्यसमग्र ॥ पूर्णझालेंअसेकीं ॥ १२० ॥ नारदबोलेत्यालागुन ॥ शिवेंएकदि

---

१ सोन्याची काठी हातांत धरणारे दूत.

धलाबाण ॥ तेणेंक्षत्रियांचेघेवोनिप्राण ॥ आतांस्वस्थबैसलासी ॥ २१ ॥ घृतेंशिंपिला वैश्वानर ॥ कींमुखावरीताडिलाव्याघ्र ॥ किंवादुखविलाफणिवर ॥ तैसाजामदग्न्य कोपेला ॥ २२ ॥ धनुष्यासीबाणलावून ॥ मार्गींउभाराहिलायेवोन ॥ सोळापद्में दळसंपूर्ण ॥ कांपोंलागलेंदशरथाचें ॥ २३ ॥ रघुपतीसह्मणेभृगुनंदन ॥ तूंक्षत्रिय ह्मणविसीपूर्ण ॥ अधमाताटिकास्त्रीवधून ॥ मोठेपणामिरविसी ॥ २४ ॥ ऐसेंऐक तांरामबोलत ॥ तुजसीशस्त्रधरावयाकायहेत ॥ सोडोनीअनुष्ठानतपव्रत ॥ राजहिं साकांकेल्या ॥ २५ ॥ ऐसेंऐकतांफरशधर ॥ सोडीतात्काळनिर्वाणशर ॥ पाहतांबा णसोडोनिरघुवीर ॥ पराभवीपरशुरामातें ॥ २६ ॥ एकसोडूनियांबाण ॥ टाकीमृत्यु मार्गरोधून ॥ चिरंजीवकेलाभृगुनंदन ॥ हेकथानाटकाधारीं ॥ २७ ॥ पुढेंदशरथ ससैन्य ॥ अयोध्यानगरींयेवोन ॥ चौघांपुत्रांसहवर्तमान ॥ आनंदेंकरूनबसताझा ला ॥ २८ ॥ राज्याभिषेककरावयारामासी ॥ दशरथविचारकरीमानसीं ॥ हेंवर्त मानसमजलेंकैकयीसी ॥ मत्सरमानसींवाटला ॥ २९ ॥ ब्रह्मादिदेवविकल्पासी ॥ ह्मणतीतूंजावोनिअयोध्येसी ॥ प्रवेशोनीकैकयीचेमानसीं ॥ विघ्नकरावेंराज्यातें ॥ ॥ ३० ॥ तात्काळविकल्पकैकयीमानसीं ॥ प्रवेशतांकैकयीह्मणेदशरथासी ॥ रामा



१ नारदानें परशुरामाला, तुझे अंगीं सामर्थ्य नाहीं असें गर्भित ह्मटलें ह्मणून अग्नीवर तूप टाकावें त्याप्रमाणें झालें.

२ परशुरामाला राग आला.

सिपाठवावनवासासी ॥ भरतालागींराज्यंद्यावें ॥ ३१ ॥ ऐसेंसमजतांरामासी ॥ नि
घालाजावयावनवासासी॥ लक्ष्मणसीताबरोबरीसेवेसी ॥ जातींझालींतेधवां ॥३२॥
रामलक्ष्मणसीतासमवेत ॥ निघोनिगेलाअरण्यांत ॥ हेंसमजतांदशरथामात ॥ प्रा
णसोडीतात्काळ ॥ ३३ ॥ भरतहोतामातुलगृहीं ॥ तेथेंसमजलीवार्ताही ॥ तात्का
ळयेवोनीस्वगृहीं ॥ दशरथप्रेतअवलोकिलें ॥ ३४ ॥ तयाचासंस्कारकरून ॥ रा
माजवळीजावोन ॥ तयाचीआज्ञाकरूनीमान्य ॥ अयोध्यारक्षणकरीतसे ॥ ३५ ॥
रामेंअरण्यांतकरितांभ्रमण ॥ कागरूपीगंधर्वयेऊन ॥ सीतेसिपीडादेतांजाण ॥ तया
सीरामेंताडिलें ॥ ३६ ॥ पुढेंदत्तात्रेयाचीभेटीघेवोन ॥ शूर्पणखाकर्णनासिकछेदून ॥
त्रिशराचाघेतलाप्राण ॥ पंचवटीसीजाताझाला ॥ ३७ ॥ तेथेंसुवर्णमृगासीदेखोन ॥
सीताह्मणेचर्मकंचुकीद्याआणोन ॥ रामगेलामृगवधाजाण ॥ तोंरावणेंसीतापळवि
ली ॥ ३८ ॥ मार्गीरावणजटायूयुद्ध ॥ झुंपतेंजाहलेंसुबद्ध ॥ जटायूसीकरूनिविद्ध
॥रावणगेलालंकेसी ॥ ३९ ॥ पुढेंरामलक्ष्मणशोककरित ॥ प्राप्तजाहलेत्याअरण्यांत॥

---

१ राम लक्ष्मणाला वनवासांत पाठवून भरताला राज्य द्यावें. २ शूर्पणखा नांवाची राक्षसीण रामाजवळ प्राप्त होऊन मला वर ह्मणून सांगूं लागली, तेव्हां रामानें लक्ष्मणाजवळ पाठविली, त्यानें तिचें नाक व कान कापिले. ३ शूर्पणखेच्या कैवारानें, तिचा बंधू त्रिशिर दैत्य युद्धाला प्राप्त झाला त्यांत रामानें त्याचा नाश केला. ४ रामाला आश्रमांतून बाहेर नेण्याकरितां मारीचदैत्यानें रावणाच्या आग्रहास्तव कपट रूप धारण केलें. ५ रामआश्रमांत नाहीं असें पाहून रावणानें सीता पळविली. ६ दशरथाचा मित्र जटायू सीतेला नेतअसतां रावणाशीं युद्ध करून जर्जरत्व पावला.

तयांसीजटायूवृत्तकथित ॥ सीताहरणाचेंसर्वही ॥ १४० ॥ जटायूसोडीप्राणसत्वर॥
करूनीतयाचासंस्कार ॥ पुढेंकरितअरण्यसंचार ॥ आलासंनिधकिष्किंधेच्या ॥४१॥
तेथेंजोडलासुग्रीवमित्र ॥ वालीचाकरूनीसंहार ॥ सुग्रीवासिस्थापूनिराज्यावर ॥
सीताशुद्धीसीसिद्धझाले ॥ ४२ ॥ मिळवोनियांवानरसेना ॥ चारींदिशेंसीपाठविले
चौघाजणां ॥ अंगदाज्ञेमारुतीलंकास्थाना ॥ जावयासीनिघाला ॥४३॥ समुद्रावरूनी
करीउड्डाण ॥ तोंमार्गीसिंहिकानिजलीजाण ॥ मुखांतछायापडतांतत्क्षण॥ मुखामाजी
पडियेला ॥ ४४ ॥ तोंमुखझांकिलेंसिंहिकेन ॥ हनुमंतधरीरूपलहान ॥ अंतरींप्रवे
शकरून ॥ उदरफोडूनिनिघाला ॥ ४५ ॥ पुढेंचालिलेंउड्डाण॥ तोंलंकादेवीआलीधां
वोन॥तिनेंमध्येंपायघालून ॥ मारुतीसीपाडिलें॥४६॥ तेधवांलंकेसिमुष्टिप्रहार ॥ वज्र
प्रायदेतवायूकुमर ॥ तिनेंस्तवनकेलेंअपार ॥ ह्मणेत्वांमजनमारावें ॥ ४७ ॥ तूंहो
सीलविजयीसाचार ॥ पुढेंउडीघेतलीदुर्धर ॥ लंकाबाह्यप्रदेशींसत्वर ॥ उडीजावो
निपडियेली ॥ ४८ ॥ तेथेंपडलंकाअसेदेवता ॥ ह्मणेकंपकांजाहलाआतां ॥ शोधा
वयादूतीतत्वतां ॥ त्यांणींवानरासीधरूनीआणिलें ॥ ४९ ॥ तेधवांहनुमंतेंकोंवळें ॥
सूक्ष्मरूपअसेधरिलें ॥ क्रौंचेनेंतेंडोळांदेखिलें ॥ हातींधरिलेंदृढतेंव्हां ॥ १५० ॥
हाचिरोनियांवानर ॥ पाककरूनिआणागेसत्वर ॥ मारुतीह्मणेमाझेंशरीर ॥ उदक

१ लंकेनें समोर येवोन मारुतीला अडविण्या बरोबर त्यानें मुष्टीनें मार दिला २ हें नांव लंकेच्या बाह्य देवतेचें होतें.

मयसर्वअसे ॥ ५१ ॥ पाककरितांजलहोई ॥ ह्मणोनीतूंतैसाचिखाईं ॥ असुरीनें
उचलोनीलवलाहीं ॥ मुखींघातलेंमारुतीसी ॥ ५२ ॥ मुखींजातांचिमारुती ॥ प्र
वेशकरीहृदयप्रांतीं ॥ काळीजधरोनीदोहातीं ॥ झोळकंबेघेतसे ॥ ५३ ॥ तेधवां
क्रौंचाव्याकुळहोत ॥ गडबडांधरणीवरीलोळत ॥ असुरीतीतेंसूकरविष्ठापाजित ॥ मा
रुतीकंटाळलाअंतरीं ॥ ५४ ॥ नासिकद्वारेंकाढीपुच्छाग्र ॥ रोगबीजह्मणोनीओढिती
बाहेर ॥ तोंपुच्छाचापडिलाढिगार ॥ पर्वतप्रायतेस्थानीं ॥५५॥ क्रौंचीचेंउदरफोडून ॥
बाहेरीआलाहनुमान ॥ राक्षसीपुच्छेंबांधोन ॥ आपटिल्याभूमीवरी ॥ ५६ ॥ तोंअ
स्तागेलाप्रभाकर ॥ निकुंबळाप्रवेशकरीवायुकुमर ॥ शोधीतचाललासीतेसीसत्वर ॥
गोपुरेंसमस्तशोधिलीं ॥ ५७ ॥ फिरतअसतांलंकेभीतरी ॥ दृष्टीदेखिलीमंदोदरी ॥
मनींह्मणेहेचिजनककुमरी ॥ ह्मणोनीआनंदेंनाचत ॥ ५८ ॥ तोंहोमकरूनियांपूर्ण॥
तेथेंआलादशानन ॥ तोंमंदोदरीउठोन ॥ पायधूततयाचे ॥ ५९ ॥ ऐसेंदेखोनीवायु
सुत ॥ क्षोभलाजैसाकृतांत ॥ ह्मणेजानकीहेनिश्चित ॥ वश्यझालीरावणा ॥१६०॥
श्रीरामवचनआठवीमारुती ॥ सीतेचेवदनींकर्पूरदीप्ती ॥ मंदोदरीजवळीजावोनित्व
रितगती ॥ वासघेतमुखाचा ॥ ६१ ॥ तोंदुर्गंधीनेंमनविटलें ॥ ह्मणेमद्यपानअसे
केलें ॥ हेंसीतारत्ननव्हेभलें ॥ ह्मणोनीनिघालातेथोनी ॥६२॥ दूतीसआज्ञाकरीद

१ सीताशुद्धीला जातेवेळीं रामानें मारुतीला खूण सांगितली होती २ सुगंध.

 

शंकंधर ॥ ह्मणेअशोकवनींजावोनिसत्वर ॥ जनकात्मजेचासमाचार ॥ घेवोनियेईं
त्वरेनें ॥ ६३ ॥ आज्ञेसरशीचालिलीदूती ॥ तियेचेमागेंचाललामारुती ॥ आला
अशोकवनाप्रती ॥ आनंदचित्तींनसमाये ॥ ६४ ॥ तोंअशोकवृक्षाचेतळीं ॥ ध्यान
स्थबैसलीजनकबाळी ॥ दूतीपरतलीतात्काळीं ॥ हनुमंततेथेंराहिला ॥ ६५ ॥ ज
यजयश्रीअयोध्यानाथ ॥ ह्मणेमुखेंवायुसुत ॥ जगन्मातादेखिलीयेथ ॥ धन्यअसें
मीत्रिभुवनीं ॥ ६६ ॥ चहूंकडेपाहेमारुती ॥ तोंरामनामेंतरुवरगर्जती ॥ पक्षीहीमु
खेंउच्चारिती ॥ राघवनामप्रेमानें ॥ ६७ ॥ ध्यानस्थबैसलीसीतासती ॥ मानसींचिं
तीरघुपती ॥ पुढेंउभाअसेमारुती ॥ बद्धांजुलीकरूनियां ॥ ६८ ॥ सीताध्यानींपा
हेरामासी ॥ तोंअवतारचिन्हनदिसेकरांगुळीसी ॥ ह्मणोनीडोळेउघडीआश्चर्येंसी ॥
तोंमुद्रिकाअसेसमोर ॥ ६९ ॥ जगद्वंद्यजोश्रीराम ॥ जोभक्तजनांसीहृदयाराम ॥
त्याचीवार्तास्वस्तिक्षेम ॥ सांगह्मणेमुद्रिकेसी ॥ १७० ॥ तोंकांगेरडतीसह्मणोनी ॥
मुखपसरोनिधांवल्याराक्षसिणी ॥ तुजआह्मींभक्षूंतोडुनी ॥ ह्मणतीसीतेसीतेधवां ॥ ७१
मगशोककरीसीता ॥ ह्मणेकैसेंकरावेंआतां ॥ धांवधांवगारघुनाथा ॥ संकटसमयीं
सोडवीं ॥ ७२ ॥ जोडूनियांदोन्हीकर ॥ जवळीयेतवायुकुमर ॥ ह्मणेसुखीअसेरघु 

१ रावण. २ जनकाची कन्या ३ सीतेच्या सहवासानें वृक्षही रामनामजप करीत होते. ४ डोळे मिटून रामाचें ध्यान करीत होती. ५ मुद्रिका. ६ कां रुदन करितेस. ७ मारुती.

वीर ॥ किष्किंधेमाजीनिश्चयें ॥ ७३ ॥ जानकीआनंदलीअपार ॥ जैसाबहुतदिव
सगेलाकुमर ॥ भेटतांहर्षहोयथोर ॥ तैसीनिर्भरजाहली ॥ ७४ ॥ मारुतीजाहला
क्षुधित ॥ क्षणएकपडलानिचेष्टित ॥ नेत्रगरगरांभोवंडित ॥ मुखपसरीतफळांला
गीं ॥ ७५ ॥ ऐसेंदेखोनितेवेळीं ॥ जगन्मातासद्गदितझाली ॥ हायहायह्मणोनीधांव
ली ॥ कुरवाळिलाकृपेनें ॥ ७६ ॥ ह्मणेउठावेंकपिश्रेष्ठा ॥ जावोनियांतरुतळवटा ॥
पतितफळेंभक्षावींवरिष्ठा ॥ वृक्षासीस्पर्शनकीजे ॥ ७७ ॥ ऐसेंऐकतांचीवचन ॥ मा
रुतीउठिलाझडकरून ॥ सीतेचेचरणवंदून ॥ वनांतकरावयानिघाला ॥ ७८ ॥ उ
पवनाचानाशकरून ॥ अखयादिराक्षसांमारून ॥ मेघनादपाशींबद्धहोऊन ॥ शेव
टीलंकाजाळिली ॥ ७९ ॥ लंकेतूनीजावयानिघत ॥ अंगदबैसलाहोताजेथ ॥ प्रा
प्तहोतांआनंदेंनाचत ॥ वानरसैन्यसर्वही ॥ १८० ॥ पुढेंयेतांरामाजवळी ॥ मार्गीं
मधुवनिकांविध्वंसिली ॥ ब्रह्मपत्रिकाआणोनिदीधली ॥ तीचाभावार्थऐकावा ॥
॥ ८१ ॥ जयजयषड्विकाररहिता ॥ नमोषड्गुणअलंकृता ॥ अरिषड्वर्गप्रतापवंता ॥
शब्दातीतानिरंजना ॥ ८२ ॥ पितुराज्ञेचेंनिमित्तकरून ॥ पंचवटींतयेऊनिराक्षसह
नन ॥ करितांपुढेंसीताहरण ॥ केलेंअसेरावणें ॥ ८२ ॥ देवअसतीबंदिशाळेंत ॥

१ आनंदयुक्त. २ श्रेष्ठा. ३ वनाचा नाश. ४ ससैन्य रावण पुत्र. ५ इंद्राजिताच्या पाशांत. ६ सुग्रीवाची मधुवन नांवाची बाग होती. ७ मारुती परत येतेवेळीं ब्रह्मदेवानें बरोबर पत्र दिलें होतें.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीमातापितृभ्यांनमः ॥
ॐनमोजीशिवाअपरिमिता ॥ मायाचक्रचाळकागुणातीता ॥ दुष्टनाशकास्कंदताता ॥
भस्मासुरजनकाभवानीपते ॥१॥ जेथेंरुद्रघोषनिरंतर ॥ तेथेंकैचेजन्ममरणसंसार॥
तिहींकलिकाळजिंकिलासमग्र ॥ शिवशिवशब्देंकरोनियां ॥ २ ॥ पापजाळावया
निश्चिती ॥ शिवनामींआहेपरमशक्ती ॥ शिवभजकांसीपुनरावृत्ती ॥ प्राप्तनोहेक
धींही ॥ ३ ॥ जेवींप्राणियाचेंचित्त ॥ विषयींमग्नझालेंअत्यंत ॥ तेवींशिवनामींहोतां
रत ॥ बंधनतयातेंनहोई ॥४॥ द्रव्यइच्छाधरोनिचित्तीं ॥ श्रीमंताचीस्तुतीकरिती ॥
तैसेजरीशिवनामींप्रवर्तती ॥ तरीजन्ममरणकैचेंतयां ॥ ५ ॥ राजभांडारींचेंधन ॥
साधावयाकरितीयत्न ॥ तैसेंजरीशिवचरणींजडेलमन ॥ तरीसंकटकैचेंतया ॥ ६॥
शिवस्थानींजींतीर्थेंअसती ॥ तेथेंभक्तीनेंजेस्नानकरिती ॥ तयांहोयशिवलोकप्राप्ती
॥ संसारदुःखनबाधे ॥ ७ ॥ धन्यतेतीर्थस्नानीरत ॥ येविषयींकथाअद्भुत ॥ नैमि
षारण्यींशौनकादिकांप्रत ॥ सूतसांगेआनंदें ॥ ८ ॥ भीमाशंकराचियेठाईं ॥ जेंप्रसि
द्धअखिलमही ॥ ऐसेंशिवतीर्थनामेंपाहीं ॥ पापाचेंनाशकअसे ॥ ९ ॥ जेकरितीत
याचेंसेवन ॥ अथवाप्रेमेंस्नानदान ॥ करितांहेतूसंपूर्ण ॥ पूर्णहोतीनिश्चयें ॥ १० ॥
निद्रास्वप्नसुषुप्तींत ॥ जेशिवतीर्थाचेंस्मरणकरित ॥ अथवाहृदयींआठवित ॥ तयां
चेंपापनष्टहोई ॥ ११ ॥ त्यातीर्थाचामहिमा ॥ नारदाश्रवणकरींउत्तमा ॥ ज्याच्याश्र

वर्णेंचीपरमा ॥ मुक्तीप्राप्तहोतसे ॥ १२ ॥ पेडगणयानामेंकरून ॥ शिवाचाएकहो
तागण ॥ त्याणेंभीमाशंकरालागून ॥ रहावयास्थानकेलें ॥ १३ ॥ भीमातीर्थाचियें
॥१॥ तीरीं ॥ प्राकारसहितगोपुरकरी ॥ तयामाझीनिरंतरीं ॥ वासकरीतसेप्रेमानें ॥१४॥ ॥२१॥
विशालऐशात्यागृहीं ॥ जयासुवर्णस्तंभअसतीपाहीं ॥ तेथेंयेवोनिसाधूसंतही ॥ सु
खेंवासकरितातीं ॥ १५ ॥ कितीकरितीवेदाध्ययन ॥ कितीएककरितीशास्त्रपठण ॥
तर्कभाष्यव्याकरण ॥ मीमांसादीवाचती ॥ १६ ॥ सूर्याचेतेजस्वीकिरण ॥ गृहामा
जीप्रवेशून ॥ अंधकाराचेंनाशन ॥ करितातीनिरंतर ॥ १७ ॥ राजमार्गाचियेठायीं ॥
सौख्येंनरनारीपाहीं ॥ भ्रमणकरितीआनंदेंही ॥ यानभूषणासहवर्तमान ॥ १८ ॥
कितीएकवीणासज्जून ॥ गायनकरितीआनंदोन ॥ कितीएककरितीमृदंगवादन ॥
तालयुक्तसर्वदा ॥ १९ ॥ गजअसतीमदयुक्त ॥ तयांचेऐकूंयेतहेषित ॥ अश्वशब्द
ऐकतांनिश्चित ॥ आनंददेतीमनासी ॥ २० ॥ येणेंप्रकारेंतोपेडगण ॥ तेथेंग्रामवस
वोन ॥ आनंदेंकरितीकालक्रमण ॥ शिवध्यानकरीतसे ॥ २१ ॥ त्यागणेंबाल्यत्वा
माजीं ॥ दिव्यलिंगस्थापूनिपूजी ॥ ह्मणूनीबाल्येश्वरनामअजी ॥ सूतह्मणेशौनका
दिकां ॥ २२ ॥ नित्यनेमेंलिंगपूजन ॥ करीतसेएकनिष्ठेंकरून ॥ रात्रंदिनशिवध्या ॥१॥
न ॥ शिवस्मरणअखंडकरी ॥ २३ ॥ ऐशाप्रकारेंसेवन ॥ करितांशंकराचेंभक्तीन ॥
प्रसन्नहोईपंचवदन ॥ तयापेडगणासी ॥२४॥ सुप्रसन्नहोवोनित्यातें ॥ वरमागह्मणे

प्रफुल्लितचित्तें ॥ ऐसेंऐकतांपेडशिवातें ॥ बोलिलातेंऐकाहो ॥ २५ ॥ जरीप्रसन्नअ
ससीशंकरा ॥ तरीमजसीद्यावेंऐसावरा ॥ तुझेनामेंएकापापहरा ॥ तीर्थायेथेंस्थापावें
॥ २६ ॥ तुझेसर्वमनोरथ ॥ पूर्णहोतीलनिश्चित ॥ प्रसिद्धहोईलमन्नामतीर्थ ॥ स्ना
नेंशुद्धिप्राणिमात्रां ॥ २७ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ पापहरतीर्थत्यास्थानासी ॥
उत्पन्नजाहलेंतेदिवशी ॥ शिवतीर्थनामत्यातें ॥ २८ ॥ ऐसावरदेऊनिपेडगणासी ॥
शंकरपावलाअंतर्धानासी ॥ सूतसांगेशौनकादिकांसी ॥ तीर्थतेथेंप्रसिद्धझालें ॥ २९ ॥
त्याशिवतीर्थालागून ॥ प्रेमेंकरितांस्नानदान ॥ जपहोमध्यानमनन ॥ मुक्तहोतीता
त्काळ ॥ ३० ॥ महापापीअसेजोनर ॥ स्नानकरितांएकवार ॥ मुक्तहोईलसाचार ॥
जगामाजीवंदनीय ॥ ३१ ॥ पेडग्रामींअन्यगण ॥ लिंगेंस्थापितीअसंख्यातजाण ॥
खोलनामकएकगण ॥ लिंगस्थापीतेथेंची ॥ ३२ ॥ लिंगनामखोलेश्वर ॥ तयातें
स्मरतांनिरंतर ॥ तयातेंप्राप्तकैलासपुर ॥ होईलजाणनिश्चयें ॥ ३३ ॥ तेथेंचिअसे
गणेश्वर ॥ अन्यअसेव्यालेश्वर ॥ खोलेश्वराचेपूर्वभागींसाचार ॥ लंबोदरविनाय
कअसे ॥ ३४ ॥ तयाचेंदर्शनघेतां ॥ कार्यसिद्धीहोईतत्वतां ॥ बालेश्वरासीपूजितां ॥
सर्वसौख्यप्राप्तहोई ॥ ३५ ॥ तेथेंचिहोतेव्यंकटेश ॥ जोपूजाकरीविशेष ॥ तयातें
प्रसन्नमहेश ॥ पूर्णहोतीहेतूत्याचे ॥ ३६ ॥ पेडग्रामींव्यंकटेशाचें ॥ जेदर्शननघेतीत्यां
चें ॥ जीवितभूमीसीभारसाचें ॥ महापापीनरतेची ॥ ३७ ॥ तेथेंअसेनृसिंहेश्वर ॥

॥ इति श्रीभीमामाहात्म्ये
एकोनात्रिंशाध्यायः ॥

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीमातापितृभ्यांनमः ॥
श्रीभीमाशंकरायनमः ॥ ॐनमोजीपार्वतीरमणा ॥ चित्तरंजनामनमोहना ॥ तारि
कांतकरामध्याना ॥ सर्वातीताजगद्गुरो ॥ १ ॥ आनंदकंदात्रिभुवनेशा ॥ मायातीता
जगदीशा ॥ तमोगुणयुक्तापरेशा ॥ सकलानंदा ॥ २ ॥ आदिअनादिगुणवंता ॥ स
कलचराचराच्याताता ॥ तूंचिअससीजगन्नियंता ॥ विश्वरूपज्ञानयुक्त ॥ ३ ॥ हिमा
द्रिजामातागंगाधरा ॥ सिंदुराननजनकाकर्पूरगौरा ॥ पद्मनाभमनरंजनात्रिपुरहरा ॥
त्रिदोषशमनात्रिपुरेशा ॥ ४ ॥ नीलग्रीवासुहास्यवदना ॥ अंधकमर्दनानंदिवहना ॥
गजांतकादक्षक्रतुमथना ॥ दानवमर्दनादयानिधे ॥ ५ ॥ अनंतभक्तप्रियकरा ॥ ता
टिकांतकपूज्यात्रितापहरा ॥ तुझामहिमावर्णावयाभोगींद्रा ॥ सामर्थ्यनसेचीसर्व
था ॥ ६ ॥ जोजोमनींधरोनीहेत ॥ तुजलागींअनन्यभावेंभजत ॥ त्यांतेंपुरविशीइ
च्छितपदार्थ ॥ कृपायुक्तहोऊनियां ॥ ७ ॥ शौनकादिकह्मणतीसूतासी ॥ त्वांबहुवि
धतीर्थेंकथिलींआह्मांसी ॥ तृप्तीनोहेगामानसीं ॥ श्रवणकरितांबहुसाल ॥ ८ ॥ ब्रह्म
देवह्मणेनारदासी ॥ पुढेंकरींचरित्रश्रवणासी ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ पुढेंचरि
त्रश्रवणकरा ॥ ९ ॥ सिद्धतीर्थयानामेंकरोनी ॥ प्रसिद्धअसेत्रिभुवनीं ॥ स्नानमात्रें
जनालागोनी ॥ मोक्षप्राप्तीतात्काळहोई ॥ १० ॥ जयाचेंकरितांएकवारश्रवण ॥
सर्वहेतूहोतीपूर्ण ॥ सिद्धिदायकजोगजानन ॥ तेणेंक्षेत्रस्थापिलें ॥ ११ ॥ त्याती

र्थासीसिद्धटेंकह्मणती ॥ सर्वकामपूर्णहोती ॥ त्याच्यादक्षिणभागींपर्वतीं ॥ सिद्धि
विनायकास्थितअसे ॥ १२ ॥ त्रिभुवनाच्याउद्धारार्थ ॥ गजाननअसेस्थित ॥ जेत
याचेंसेवनकरित ॥ तयांसीमुक्तीप्राप्तहोई ॥ १३ ॥ नारदह्मणेविधीसी ॥ सांगामज
गजाननउत्पत्तीसी ॥ कायकारणझालेंत्यासी ॥ तेंमजसीनिवेदावें ॥ १४ ॥ ब्रह्मदे
वह्मणेनारदातें ॥ गजासुरनामेंदैत्यपृथ्वीतें ॥ राज्यकरीभीमातीरातें ॥ महाक्रूरअ
सेतो ॥ १५ ॥ तयाचीसंपत्तीअसेअपार ॥ सेनासमुदायअसेथोर ॥ तयालागींजिं
किणार ॥ त्रिभुवनींनसेकोणीही ॥ १६ ॥ देवविचारकरितीमानसीं ॥ कोणताउ
पायकरावायासी ॥ ह्मणोनीनिघालेयुद्धासी ॥ गजासुराचेबरोबरी ॥ १७ ॥ युद्धमांडिलेंअ
सेथोर ॥ शस्त्रास्त्रांचाकरितीमार ॥ प्रतिदेवगणांचेंशरीर ॥ क्षतांकितजाहलेंअसे ॥
॥ १८ ॥ युद्धींहोतांपराजय ॥ कोठेंनमिळेतयांसीठाय ॥ जावोनियांस्वर्गालय ॥
वासकरूंपाहती ॥ १९ ॥ ईतुक्यांतोगजासुर ॥ क्रोधेंहोवोनीनिर्भर ॥ आज्ञापीत
सेसत्वर ॥ युद्धालागींसिद्धव्हाया ॥ २० ॥ सेनाघेवोनिबरोबरी ॥ युद्धासचालिलास्व
र्गपुरीं ॥ मुखेंगर्जनाकरीथोरी ॥ स्वर्गलोकींपातला ॥ २१ ॥ देवांसिह्मणेगजासुर ॥
युद्धासीउठासत्वर ॥ अथवासोडोनीस्वर्गपुर ॥ पलायनकरायेथोनी ॥ २२ ॥ ॥३॥
अथवाद्यावाकरभार ॥ ऐसेंगर्जोनिबोलेक्रूर ॥ ऐसेंवचनऐकतांसुर ॥ बोलतीतया
दैत्यासी ॥ २३ ॥ तुजसीकरभारकितीद्यावा ॥ हेंसांगेंगाक्रूरस्वभावा ॥ ऐसेंऐक

तांगजासुरदेवां ॥ सांगेआनंदेंकरोनी ॥ २४ ॥ तुमचेभक्षणपदार्थ ॥ मजसीद्याहो आनंदयुक्त ॥ वंदनकरामाझेचरणाप्रत ॥ आनंदयुक्तहोऊनियां ॥ २५ ॥ आपुलें शिरकरूनीकंडन ॥ मजलागींद्यावेंभोजन ॥ ऐसेंऐकतांदैत्यवचन ॥ देवजाहलेभ ययुक्त ॥ २६ ॥ ब्रह्मदेवासीजावोनिशरण ॥ विनवितेझालेत्यालागुन ॥ दैत्यांसीउ पायकरावाकवण ॥ ह्मणोनीवृत्तनिवेदिती ॥ २७ ॥ आपुलींशिरेंतोडुनी ॥ भोजन द्यावेंकंडनकरोनी ॥ ऐसेंदेववचनपडतांश्रवणीं ॥ ब्रह्मदेवऊठला ॥ २८ ॥ देवांसी घेवोनीबरोबरी ॥ ब्रह्मदेवगेलाक्षीरसागरीं ॥ शेषशयनजोमुरारी ॥ तयासीवृत्तनि वेदीहें ॥ २९ ॥ तदनंतरेंब्रह्माआणिवैकुंठपती ॥ गेलेजेथेंशंकरपार्वती ॥ तयांसीं सर्ववृत्तकथिती ॥ महद्दुःखेंकरूनियां ॥ ३० ॥ ऐकतांदेवांचेंवचन ॥ महादेवसांगे त्यांलागून ॥ तुह्मींहोऊनिस्वस्थमन ॥ आनंदेंकालक्रमावा ॥ ३१ ॥ तदनंतरेंश करपार्वती ॥ उभयतांहस्तीचेंरूपघेती ॥ आनंदेंदोघेंसुरतकरिती ॥ गर्भराहिला पार्वतीसी ॥ ३२ ॥ नऊमासभरतांपरिपूर्ण ॥ पुत्रजाहलागजानन ॥ चारहस्त त्यालागुन ॥ नेत्रविशालअसतीत्याचे ॥ ३३ ॥ गजाननयेतांजन्मासी ॥ देव दुंदुभीवाजवितीस्वर्गासी ॥ करितेजाहलेपुष्पवृष्टीसी ॥ महानंदेंकरूनियां ॥३४ ॥ ब्रह्मादिकदेवगण ॥ विमानामाजीबैसोन ॥ आनंदतीपरिपूर्ण ॥ गजानना सीपाहूनी ॥ ३५ ॥ गंधर्वांसहअप्सरोगण ॥ करितीनृत्यगायन ॥ पुण्यतमा

 नद्याजाण ॥ वाहतीपरिपूर्णहोवोनी ॥ ३६ ॥ सर्वांसीसुखकारकपवन ॥ वाहे 
सुगंधयुक्तहोवोन ॥ दिशास्वच्छजाहल्यापूर्ण ॥ गजाननासीदेखतां ॥ ३७ ॥
 ब्रह्मदेवाशींसहवर्तमान ॥ गजाननाचेंजातकरण ॥ करिताजाहलापार्वतीरमण ॥ 
महानंदेंकरोनियां ॥ ३८ ॥ नामठेविलेंगजानन ॥ शंकरब्राह्मणाकारण ॥ अपारदे
ताजाहलादान ॥ गोदानेंहीदेताजाहला ॥ ३९ ॥ शतावधीग्रामदान ॥ शंकरदेईब्राह्म
णांलागून ॥ तदनंतरकांहींकालेंकरून ॥ गजाननविवाहकरिताजाहला ॥ ४० ॥ का
र्यसिद्धिकर्त्रींसिद्धी ॥ ज्ञानवर्धकबुद्धी ॥ अणिमामहिमागरिमादी ॥ ईशित्वही ॥ ४१ ॥
वशित्वप्राप्तिप्राकाम्य ॥ यादाहाभार्यामनोरम ॥ विवाहार्थदेताहोयब्रह्म ॥ गजान
नाकारणें ॥ ४२ ॥ तदनंतरगणेशाप्रती ॥ ब्रह्मादिदेवविनविती ॥ तुह्मीजावेंभीमा
शंकराप्रती ॥ गजासुरासीवधावें ॥ ४३ ॥ तैसेंचआज्ञापीशंकर ॥ ह्मणेत्वांजावोनि
सत्वर ॥ युद्धकरोनितोअसुर ॥ रणामाजीवधावा ॥ ४४ ॥ ऐसेंएकतांपितृवचन ॥
भीमाशंकरींगेलागजानन ॥ दैत्यासीहाकमारोन ॥ युद्धानागींबोलावी ॥ ४५ ॥ दो
घांसीजाहलेंअनिवार ॥ शस्त्रेंताडितीपरस्पर ॥ अस्त्रेंभासतीदुर्धर ॥ रणकंदनमाजलें
॥ ४६ ॥ गजाननेंबाणमारून ॥ गजासुरासीताडिलातीक्ष्ण ॥ मूर्च्छागतअसुरहोवो 
न ॥ भूमीवरीपडियेला ॥ ४७ ॥ तत्काळदुसराबाणटाकोन ॥ गजासुरसारथीविंधो
न ॥ खालींपाडिलारथावरून ॥ मूर्च्छागतजाहला ॥ ४८ ॥ पुनःअसुरसावधजाह

ला ॥ गजाननासीबोलिला ॥ आतांसाहेंमाझ्याबाणाला ॥ ह्मणोनिटाकिलाशर ॥
॥ ४९ ॥ त्याबाणाचेयोगेंकरून ॥ उंदिरपडलामूर्च्छायुक्तहोऊन ॥ गजाननजाहला
रहितवाहन ॥ पदातियुद्धसुरूजाहलें ॥५०॥ परशुहस्तींधरून ॥ क्रोधेंसंतप्तहोऊन ॥
आरक्तकरूनियांनयन ॥ शिरउडविलेंअसुराचें ॥ ५१ ॥ भाद्रपदशुक्लपक्षीं ॥ चतु
र्थीतिथीअनुलक्षी ॥ इंद्रादिदेवांचेसाक्षी ॥ असुरातेंवधियेलें ॥ ५२ ॥ देवकरि
तीपुष्पवृष्टी ॥ सर्वांच्याआनंदल्यादृष्टी ॥ आज्ञाकरीपरमेष्ठी ॥ दुंदुभीवादनाकारणें ॥
॥५३॥ गणेशाचेप्रसादान ॥ देवमानसींआनंदोन ॥ रा[illegible]यकरितीस्वलोकींजावोन ॥
प्रसन्नचित्तेंकरोनियां ॥ ५४ ॥ ऐसेंदेवकार्यकरोनी ॥ बैसलापर्वतींजावोनी ॥ आ
पुल्यास्त्रियांसहवर्तमानी ॥ तपकरीभीमाशंकरीं ॥ ५५ ॥ तेथेंजाहलेंसिद्धतीर्थ ॥
तयातेंजोभावेंभजत ॥ तयासीसंसारबंधनबाधत ॥ पुनर्जन्महीप्राप्तनोहे ॥ ५६ ॥
तेथेंचिब्रह्मातपकरी ॥ इंद्रियेंहीस्वाधीनकरी ॥ ह्मणोनीब्रह्मतीर्थनिर्धारीं ॥ प्रसिद्धजा
हलेंपुण्यदायक ॥ ५७ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ ब्रह्मदेवेंसांगीतलेंनारदासी ॥
तेंचिआख्यानम्यातुह्मासी ॥ यथामतीनिवेदिलें ॥ ५८ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥
याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ५९ ॥ इतिश्रीपद्मपु
राणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ सिद्धविनायकतीर्थब्रह्म
तीर्थमहिमावर्णनंनामत्रिंशत्तमाध्यायगोडद्दा ॥ ३० ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ १९०३ ॥

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीमातापितृभ्यांनमः ॥
ॐनमोजीपरमपुरुषा ॥ पार्वतीरमणामहेशा ॥ परमानंदविलासा ॥ ज्ञानवंतापिना
कधरा ॥ १ ॥ जेजेमनींधरोनिहेत ॥ तुजस्वामीअनन्यभजत ॥ त्यांतेंपुरविशीइ
च्छितवस्त ॥ दयावंतहोऊनियां ॥ २ ॥ नित्यशांतानिर्विकल्पानिरंजना ॥ आशा
पाशरहितापूर्णा ॥ निजभक्तपाशमोचना ॥ गिरिजापतेतुजनमो ॥ ३ ॥ सूतह्मणेशौ
नकादिऋषींसीं ॥ मागीलअध्यायींतुह्मांसी ॥ निवेदिलेंसिद्धतीर्थासी ॥ पुढेंविष्णु
तीर्थश्रवणकरा ॥ ४ ॥ विधीह्मणेनारदासी ॥ श्रवणकरींएकभावेंसी ॥ विष्णुती
र्थाचियामहिमेसी ॥ श्रवणमात्रेंमुक्तिलाधे ॥ ५ ॥ वैवस्वतमनूचियेवंशीं ॥ खेडना
मकराजापरियेशीं ॥ युक्तचतुरंगबलेंशीं ॥ असताजाहलाभीमाक्षेत्रीं ॥ ६ ॥ तेणें
भीमाशंकरापाशीं ॥ क्षेत्रस्थापिलेंप्रयत्नेंशीं ॥ खेडक्षेत्रंनामतयाशी ॥ ठेविलेंअसेप्री
तीनें ॥ ७ ॥ ऐसेंऐकतांविधिवचन ॥ नारदकरीपुनरपीप्रश्न ॥ कैसेंक्षेत्रस्थापिलेंरा
जान ॥ तेंवृत्तसांगामजलागीं ॥ ८ ॥ सूर्यासीसौख्यदेणार ॥ श्रीयुक्तअसेनृपवर ॥
त्याचाऐकेंवृत्तविस्तार ॥ एकचित्तेंकरूनियां ॥ ९ ॥ खेडकनामेंराजाबळवंत ॥ सा
डेतीनकोटीवर्षेंपर्यंत ॥ स्वस्थमानसेंराज्यकरित ॥ होतापृथ्वीवरी ॥ १० ॥ तयाची
बुद्धिविलक्षण ॥ मिथ्याभासूंलागलेंसंपूर्ण ॥ सत्यएकब्रह्मजाणोन ॥ विचारतयाचा
करीतसे ॥ ११ ॥ तेंचिस्वरूपसत्यमानावें ॥ इतरसर्वव्यर्थभावावें ॥ ईशपदाचेंचिं

तनकरावें ॥ तारकतेंची ॥ १२ ॥ जोंवरीदृढअसेदेह ॥ जोंवरीव्यवहारयुक्तइंद्रियस
मूह ॥ जोंवरीदूरजराग्राह ॥ तोंवरीसर्वकल्पना ॥ १३ ॥ जोंवरीइंद्रियेंस्वाधीनअस
॥ १ ॥ ती ॥ तोंवरीसाधावीपारमार्थिकस्थिती ॥ अस्वस्थइंद्रियेंजाहल्यावरती ॥ सौख्य ॥ ३० ॥
कोठोनिप्राप्तहोई ॥ १४ ॥ सुखेच्छुजेअसतीत्यांनीं ॥ देहहीअर्पावायाचकांलागूनी ॥
नअर्पितांत्यांलागोनी ॥ सौख्यकोठोनीहोईल ॥ १५ ॥ मेरुमांदारासमानपर्वत ॥
भूमीवरीअसंख्यात ॥ बहुकालपर्यंतनांदत ॥ भारनहोईभूमीसी ॥ १६ ॥ मोठमो
ठेअसतीपाषाण ॥ भूमीवरीअसंख्यजाण ॥ हिंसकप्राण्यांचाभूमीलागून ॥ भारन
होईकदापी ॥ १७ ॥ जेजारकर्मपरायणनर ॥ अथवाईश्वरसेवापराङ्मुखक्रूर ॥ त
यांचाहोतोभूमीसभार ॥ ऐसाविचारकरीराजा ॥ १८ ॥ ऐसेंविचारितांअंतरीं ॥ त
यासीविवेकझालाभारी ॥ निघालातेथोनिझडकरी ॥ देहसार्थकाकारणें ॥ १९ ॥
मार्गक्रमूनिराजाबळी ॥ च्यवनऋषीचेआश्रमाजवळी ॥ प्राप्तजाहलातात्काळीं ॥
साष्टांगनमीऋषीसी ॥ २० ॥ मधुपर्कादिविधानेंकरून ॥ राजाकरीऋषीचेंपूजन ॥
सुप्रसन्नऐशाऋषीलागून ॥ प्रश्नकरीनृपवर ॥ २१ ॥ हेऋषेमीअसेंदीन ॥ तुह्मांआ
लोंअनन्यशरण ॥ माझेंकराजीरक्षण ॥ राज्यभारेंदुःखीअसें ॥ २२ ॥ मजसीखेद ॥ ३ ॥
जाहलाअत्यंत ॥ संसारामाजीनसेअर्थ ॥ व्यर्थअसेंदुःखेंभोगित ॥ वैराग्यनोहेऐसे
नी ॥ २३ ॥ कोठेंजावेंकायकरावें ॥ कैसेंमाझेंदुःखदुरावे ॥ राज्यसौख्यमजसीनभा

वे ॥ उपायसांगामुक्तीचा ॥ २४ ॥ ऐसेंऐकतांराजवचन ॥ ऋषिद्ववलाकरुणाघन ॥
तयासीसांगेदुःखनिवारण ॥ सूतह्मणेऐकाऋषिहो ॥ २५ ॥ क्षणभंगुरजरीदेहअसे ॥
भारतींजोनरजन्मायेतसे ॥ तयापापलेशनवसे ॥ मुक्तहोईदेहांतीं ॥ २६ ॥ तयासी
नसेपुनर्जन्म ॥ प्राप्तनोहेमायाभ्रम ॥ तयासीकरितीप्रणाम ॥ देवादिकहीप्रेमानें ॥२७
अंवंतिकाकांचीअयोध्या ॥ मथुराकाशीआणिमाया ॥ द्वारावतीआदिकपुऱ्या ॥ स्म
रणमात्रेंमोक्षदेती ॥२८॥ कृष्णकृष्णकृष्णनामान ॥ जोकरीअखंडस्मरण ॥ जला
भेदूनिजैसेंकमलजाण ॥ नरकापासूनिसुटेतैसा ॥ २९ ॥ जेथेंशालिग्रामशिला ॥
अथवाद्वारावतीशिला ॥ किंवादोहींचाहीजेथेंमेळा ॥ करतलामलकवत्मुक्तीतेथें॥३०
काष्ठींअथवापाषाणीं ॥ अथवामृत्तिकेचेस्थानीं ॥ देवनसेराहिलाभरोनी ॥ जेथेंभाव
तेथेंदेव ॥ ३१ ॥ ह्मणोनिदृढधरावाभाव ॥ तात्काळप्रसन्नहोईलदेव ॥ ऐसेंसांगेमु
निराव ॥ तयाराजालागोनी ॥ ३२ ॥ प्रातःकाळींजेनित्यनेमान ॥ घेतीनर्मदाजल
दर्शन ॥ तयांसीहोतांदेहावसान ॥ विष्णुलोकप्राप्तहोई ॥३३ ॥ ब्राह्मणअथवागा
ईचा ॥ स्त्रियाअथवाबालकाचा ॥ प्राणजातअसतांसाचा ॥ देहदेवोनीसोडवावे॥३४
ब्रह्मज्ञानेंमुक्तिप्राप्त ॥ तेंज्ञानविष्णुसेवनेंहोत ॥ ह्मणोनिविष्णुसेवासतत ॥ दृढभावें
करावी ॥ ३५ ॥ ऐशाप्रकारेंम्यांतुजसी ॥ मोक्षमार्गवदलोंस्नेहेंसी ॥ येथेच्छकरीं
आचरणासी ॥ ऋषिह्मणेरायातें ॥ ३६ ॥ राजाह्मणेऋषीकारणें ॥ अज्ञानमीकां

हीनजाणें ॥ मजमार्गदाखवादयेनें ॥ मुक्तकरादुःखातुनी ॥ ३७ ॥ नृपाजाईंभी
माशंकरीं ॥ तेथेंविष्णूचीसेवाकरीं ॥ तोचिज्ञानदेईलझडकरी ॥ संशयनधरींमान
सीं ॥ ३८ ॥ ऐसेंएकोनिऋषिवचन ॥ भीमाशंकरींकरीगमन ॥ राज्यदिधलेंसोडोन ॥
तपमांडिलेंदुर्धर ॥ ३९ ॥ पुढेंबहुतकालेंकरून ॥ विष्णुजाहलाप्रसन्न ॥ ह्मणेकायइ
च्छातुजलागून ॥ खेडरायासांगेंपां ॥ ४० ॥ खेडराजाह्मणेविष्णूसी ॥ जरीमजप्रस
न्नजाहलासीं ॥ ज्ञानव्हावेंपूर्णमजसी ॥ आणितवनामेंतीर्थव्हावें ॥ ४१ ॥ ऐसेंऐक
तांनृपवचन ॥ तथास्तुह्मणेनारायण ॥ तेथेंचिपावलाअंतर्धान ॥ ज्ञानजाहलेंराया
सी ॥ ४२ ॥ त्यारायानेंराहावयासी ॥ स्थानकेलेंतेस्थानासी ॥ तेंचिखेडक्षेत्रपरि
येसीं ॥ राजावासकरीतेथें ॥ ४३ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ त्यादिवसापासूनते
स्थानासी ॥ प्रसिद्धीजाहलीविष्णुतीर्थासी ॥ स्नानमात्रेंमुक्तिलाभे ॥ ४४ ॥ विधी
ह्मणेनारदाप्रत ॥ तेथेंअसेकात्यायनतीर्थ ॥ त्याच्याऐकेंमहिमेप्रत ॥ दृढभावेंकरू
नियां ॥ ४५ ॥ कात्यायननामकऋषी ॥ आश्रमकरीतेस्थानासी ॥ त्याकात्याय
नाश्रमासी ॥ कात्यायनतीर्थप्रसिद्धझालें ॥ ४६ ॥ तेथेंकरितांश्राद्धतर्पण ॥ मुक्तिलाधे
पितरांलागून ॥ एकवारकरितांस्नान ॥ वाजपेयफलमिळे ॥ ४७ ॥ तेथेंतीर्थलिंगेंती
नलक्षअसती ॥ दृश्यअथवाअदृश्यअसती ॥ एकवारकरितांतयांप्रणती ॥ सर्वहे
तुहोतीपूर्ण ॥ ४८ ॥ सूतह्मणेशौनकादिऋषींसी ॥ विधीनेंसांगीतलेंनारदासी ॥ तें

चिआख्यानम्यांतुह्मांसी ॥ यथामतिकथियेलें ॥ ४९ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ५० ॥ इतिश्रीपद्म पुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ विष्णुतीर्थकात्याय नतीर्थ महिमावर्णनंनाम एकत्रिंशत्तमाध्यायगोडहा ॥ ३१ ॥ ॥ छ ॥
॥ छ ॥ ॥ छ ॥ ओंव्या संख्या ॥ १९५३ ॥ ॥ छ ॥



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनम ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीमातापितृभ्यांनमः ॥
ॐनमोजीपुराणपुरुषा॥स्कंदजनकापरेशा ॥ त्रिभुवनपालकास्मशानविलासा ॥ दक्ष
जामातासतीजानी ॥ १ ॥ तुझेंस्वरूपमीनजाणें ॥ खरेंतत्वतेंहीनेणें ॥ ह्मणोनिवा
टेलाजिरवाणें ॥ मंगलार्थतुजनमो ॥२॥ नीलकंठाप्रसन्नवदना ॥ वृषभवाहनात्रि
पुरदहना ॥ दैत्यांतकादक्षयज्ञमथना ॥ मनमोहनाजगत्पते ॥ ३ ॥ मदनांतकाचि
त्तरंजना ॥ मदमत्सरकाननदहना ॥ अविद्याविपिननिकृंतना ॥ दानवमर्दनादया
निधे ॥ ४ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ पुढेंश्रवणकरादेवतीर्थमहिमेसी ॥ ब्रह्म
देवसांगेनारदासी ॥ एकचित्तेंश्रवणकरीं ॥ ५ ॥ सर्वहेतूपूर्णकरी ॥ ऐसेंदेवतीर्थनि
र्धारीं ॥ भुक्तिमुक्तीप्राप्तझडकरी ॥ स्नानमात्रेंहोताती ॥ ६ ॥ तयाचेंवृत्तकरीं
श्रवण ॥ पालाशदेवयानामान ॥ तेणेंकेलेंवसतिस्थान ॥ पालाशक्षेत्रह्मणतीतया ॥
॥ ७ ॥ पालाशक्षेत्रभीमातीरीं ॥ प्रसिद्धअसेमहीवरी ॥ तेथेंजोभक्तीनेंवासकरी ॥
तयासीसौख्यप्राप्तहोय ॥ ८ ॥ पुढेंदेवआणिअसुरांत ॥ द्वेषपडियेलाअत्यंत ॥ दे
वांसीस्वर्गजाहलाप्राप्त ॥ इलाघेतलीदैत्यांनीं ॥ ९ ॥ कर्मभूमीचियेठायीं ॥ वस
तिस्थानकेलेंदेवांहीं ॥ देवहविर्भागहरिलेअसुरांहीं ॥ चिंतायुक्तदेवझाले ॥ १० ॥
ब्रह्मदेवसांगेनारदासी ॥ दुःखितहोवोनीदेवमजसी ॥ शरणयेवोनीकथितीवृत्तासी ॥
ह्मणतीकायकरावेंपुढें ॥ ११ ॥ मीसांगीतलेंतयांसी ॥ तुह्मींजावोनिभीमाशंकरा

भी.मा. सी ॥ वृत्तकथावेंपालाशदेवासी ॥ स्वस्थानप्राप्तहोईल ॥ १२ ॥ ऐसेंऐकतांमाझेंवच अ०
न ॥ प्राप्तझालेपलाशदेवक्षेत्राकारण ॥ तयासीकथितीवृत्तसंपूर्ण ॥ असुरांहींपीडा
॥ १ ॥ दीधली ॥ १३ ॥ पलाशदेवेंकेलाअंगिकार ॥ तेथेंथोरमाजलेंसमर ॥ पलाशदेवेंजिं ॥३२॥
किलेअसुर ॥ सौख्यझालेंदेवांसी ॥ १४ ॥ त्यापलाशदेवेंतेस्थानीं ॥ पलाशेश्वर
लिंगस्थापुनी ॥ भक्तीकरीदृढअंतःकरणीं ॥ सदासर्वदादृढभावें ॥ १५ ॥ पलाशदेव
तेधवांबोलला ॥ पूजनीयशंकरभोळा ॥ जोलागेलत्याच्याचरणांला ॥ तयासीमुक्ती
प्राप्तहोई ॥ १६ ॥ ऐसेंबोलोनितयेस्थानीं ॥ देवालयबांधिलेंसगुणी ॥ तयाच्याता
त्काळदर्शनीं ॥ सौख्यहोईअपार ॥१७॥ तेथेंकरीतपाचरण ॥ शंकराचेंकरीध्यान ॥
तेथेंतयाचेनामान ॥ तीर्थजाहलेंप्रसिद्ध ॥ १८ ॥ तेदिवसापासोनित्यातीर्थीं ॥ वसिष्ठा
दिऋषीतपश्चर्याकरिती ॥ प्रयत्नेंपंचाग्निसेविती ॥ ईश्वरध्यानकरितीप्रेमें ॥ १९ ॥
तेथेंजेंजेंद्यावेंदान ॥ तेंअनंतपटहोतसेजाण ॥ तेथेंकरितांशिवध्यान ॥ सायुज्यप्राप्त
होतसे ॥२०॥ नहुषराजातेस्थानीं ॥ अश्वमेधशतकरीएकोनि ॥ इंद्रपदप्राप्तव्हावया
लागोनी ॥ अवधीराहिलाथोडाची ॥ २१ ॥ पुढेंतपकेलेंदारुण ॥ इंद्रलोकींकरीगम
न ॥ तपसामर्थ्येंइंद्रस्थान॥प्राप्तझालेंतयासी॥२२॥बहुषह्मणेबृहस्पतीसी ॥ मीप्राप्तझा ॥ ३ ॥
लोंइंद्रपदासी ॥ भोगितोंअखिलसुरसंपदेसी ॥ परीइंद्राणीकांनयेई ॥ २३ ॥ तरी
तुह्मींजावोनित्वरित ॥ शचीसीआणावीयेथ ॥ ऐसेंऐकतांचिभाषित॥आश्चर्यकरीदेव

गुरू ॥ २४ ॥ तेथोनिजाईशचीमंदिरीं ॥ तीतेंपाहतांचिहास्यकरी ॥ तीतेंह्मणेऐकेंसुं
दरी ॥ नहुषआज्ञानिवेदी ॥ २५ ॥ ऐसेंऐकतांबृहस्पतीवचन ॥ शचीजाहलीक्रोधायमा
न ॥ बृहस्पतीसीबोललीवचन ॥ सूतह्मणेऋषींसी ॥ २६ ॥ तेणेंनव्याण्णवयज्ञके
ले ॥ तपबळेंइंद्रपदघेतलें ॥ मत्प्राप्तीयोग्यभलें ॥ सामर्थ्यनसेतयाअंगीं ॥ २७ ॥ तरीअ
ज्ञानमोडवेमजसी ॥ ह्मणोनिसांगतेंउपायासी ॥ तुह्मीजावोनीसांगात्यासी ॥ अयोग्यंया
नेंयेथेंयावें ॥ २८ ॥ ऐसेंऐकतांशचीवचन ॥ जावोनिसांगेनहुषाकारण ॥ ऐसेंऐकतांबृह
स्पतीवचन ॥ विचारकरीमानसीं ॥ २९ ॥ जेंजेंवाहनआणीमानसीं ॥ तेंयोग्यअसेबैसाव
यासी ॥ पुढेंयोजिलेंतपस्वीब्राह्मणांसी ॥ शिबिकावाहण्यालावावें ॥ ३० ॥ बोलावोनीसप्तऋ
षींसी ॥ तैसेचिअन्यसर्वऋषी ॥ लाविताझालाशिबिकेसी ॥ महापापीदुरात्मा ॥ ३१ ॥
ब्राह्मणहोतेजरठजीर्ण ॥ तपश्चर्येनेंकृशजाहलेजाण ॥ चालावयानसेअवसान ॥
ह्मणोनीसर्पसर्पह्मणेनहुष ॥ ३२ ॥ अत्यंतपीडाजाहलीऋषींसी ॥ क्रोधयुक्तजाहलेमा
नसीं ॥ ह्मणतीसर्पहोईंत्यासी ॥ शापऐसादेतेझाले ॥ ३३ ॥ ऐसाशापदेतांऋषीं
नीं ॥ तात्काळपडिलाशिबिकेंतुनी ॥ पलाशदेवक्षेत्रस्थानीं ॥ सर्पहोवोनीपातला ॥
॥ ३४ ॥ पुण्यवंतजनांनीं ॥ नहुषदेखिलातेस्थानीं ॥ पलाशदेवेश्वरलिंगदर्शनीं ॥
मुक्तीतयासीप्राप्तझाली ॥ ३५ ॥ तेथेंतीनलक्षतीर्थलिंगेंअसती ॥ कांहीदृश्यवाअदृ

---

१ ज्या वाहनावर कोणी बसत नाहीं अशा. २ चला चला.

इयअसती ॥ तयांचेंजेदर्शनघेती ॥ मुक्तहोतीतात्काळ ॥ ३६ ॥ सूतह्मणेशौनका
दिकांसी ॥ ब्रह्मदेवेंसांगीतलेंनारदासी ॥ तेंचिआख्यानम्यांतुह्मांसी ॥ यथसांगनि
वेदिलें ॥ ३७ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचिदत्तकृपेन ॥ के
लेंअसेमान्यअसो ॥ ३८ ॥ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरि
त्रे सूतकथितकथाकल्पतरौ पलाशदेवक्षेत्रतीर्थमहिमावर्णनंनामद्वात्रिंशत्तमाध्यायगो
डहा ॥ ३२ ॥ ॥ ॥ ओंव्या संख्या ॥ १९९१ ॥ ॥ ॥



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥श्रीमातापितृभ्यांनमः ॥
श्रीभीमाशंकरायनमः ॥ ॐनमोजीआदिपुरुषा ॥ जगद्वंद्यामायाविलासा ॥ गौरी
रमणाधर्माध्यक्षा ॥ अनंतनामाजगत्पते ॥ १ ॥ सर्वदेवांमाजीश्रेष्ठ ॥ विरक्तांमा
जीवरिष्ठ ॥ प्रलयाग्नीवतकोपिष्ठ ॥ आजनुबाहु ॥ २ ॥ सर्वजगातेंपालनकरिसी ॥
पापिष्ठजनांउद्धरिशी ॥ नामानामातीतअससशी ॥ पार्वतीरमणा ॥ ३ ॥ साधुजनां
चेंपालनकरिशी ॥ दुष्टजनांतेंशिक्षालाविशी ॥ भजकांलागींप्रसन्नहोशी ॥ गणअ
सतीसेवेशीतुझ्या ॥ ४ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ पुढेंश्रवणकराहनुमत्तीर्थम
हिमेसी ॥ विधिसांगेनारदासी ॥ चरित्रश्रवणकरींपुढें ॥ ५ ॥ दुसरेंअसेकूर्मतीर्थ ॥
कूर्मग्रामअसेविख्यात ॥ स्मरणेंभुक्तिमुक्तिहोतीप्राप्त ॥ स्नानमात्रेंकार्यसिद्धी ॥ ६ ॥
त्याकूर्मनामकग्रामात ॥ वीतहव्यनामकऋषिख्यात ॥ तपश्चर्याहोताकरीत ॥ ए
कनिष्ठेंकरूनियां ॥ ७ ॥ भीमातीराचियेठाईं ॥ तोकूर्मग्रामअसेपाहीं ॥ तेथेंतोतप
करीवीतहव्यही ॥ विष्णुध्यानकरीतसे ॥ ८ ॥ ब्राह्मणाचानाशकरावयाशी ॥ मधु
कैटभशोणिताशी ॥ प्राप्तजाहलेतेस्थानाशी ॥ महाक्रोधेंकरूनियां ॥ ९ ॥ तयांतें
करितांअवलोकन ॥ कूर्मरूपधरिलेंविष्णून ॥ सुदर्शनचक्रेंकरून ॥ तयांअसुरां
मारिलें ॥ १० ॥ तेथेंजाहलेंकूर्मतीर्थ ॥ त्यांतभक्तीनेंजोस्नानकरित ॥ तयाचेमान
सिकसंपूर्णहेत ॥ पूर्णहोतीतात्काळीं ॥ ११ ॥ तेथेंकरितांतर्पण ॥ नरकींअसतीज

रीपितृगण ॥ तात्काळमुक्तहोवोन ॥ स्वर्गींनांदतीसौख्यानें ॥ १२ ॥ त्याकूर्मग्रामीं
दुसरेंतीर्थ ॥ नामअसेहनुमंत ॥ तयाचेंजोस्मरणकरित ॥ तयासीमुक्तीप्राप्तहोई॥
 ॥ १३ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ त्याचेंतीर्थम्यांतुह्मांसी ॥ सांगतोंएकाएकभा 
वेंसी ॥ भुक्तिमुक्तीलाधती ॥ १४ ॥ इंद्रलोकींच्याअप्सरेसी ॥ शापप्राप्तझालापरि
येसीं ॥ वानरस्वरूपजाहलेंतीसी ॥ नामअसेअंजना ॥१५॥ तीसौख्येंकूर्मक्षेत्रीं॥
तीर्थस्थानींवासकरी ॥ ऋतुप्राप्तझालाएकेअवसरीं ॥ चिंताकरीमानसीं ॥ १६ ॥ को
णकरीलऋतुकालपूर्ण ॥ इतुक्यांतवायूयेवोन ॥ भोगदेईतिजलागून ॥ गर्भवतीजाह
ली ॥१७॥ नवमासभरतांपरिपूर्ण ॥ पुत्रजाहलाहनुमान ॥ तेणेंलंकेंतजावोन ॥ राक्ष
ससंपूर्णवधियेले ॥१८॥ तेथेंकृतकार्यहोवोनी ॥ पुनरपीपूर्वस्थानींयेवोनी ॥ वासकरीशि
वध्यानीं ॥ रतअसेनिरंतर ॥ १९ ॥ तेथेंजाहलेंहनुमत्तीर्थ ॥ पापीजनांतेंमुक्तकरि
त ॥ तयाचेंजेसेवनकरित ॥ पापमुक्तहोतीते ॥ २० ॥ तयाचेंजेघेतीदर्शन ॥ तयां
चेहेतूहोतीपूर्ण ॥ एकोनतीसलक्षलिंगेंजाण ॥ तयातीर्थीआसती ॥ २१ ॥ इंद्रादिक
सुरवर ॥ वसिष्ठादीऋषीश्वर ॥ सिद्धचारणगुह्यककिन्नर ॥ सेवाकरितीतीर्थाची ॥
॥ २२ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ भैरवतीर्थाचियेमाहिमेसी ॥ श्रवणकरींएकचित्तें 
सी ॥ पापनाशकतीर्थतें ॥ २३ ॥ भुक्तिमुक्तिप्रदजाण ॥ सर्वपापाचेंनाशन ॥ सर्व
रोगांकरीशमन ॥ सिद्धिदायकअसेतें ॥ २४ ॥ तयाचासांगाइतिहास ॥ नारदह्म

णेब्रह्मदेवास ॥ तात्काळआलाउल्हास ॥ ब्रह्मदेवाकारणें ॥ २५ ॥ चतुर्भुजनाराय
ण ॥ सृष्टिकर्ताब्रह्मदेवजाण ॥ मायेनेंमोहितहोऊन ॥ परस्परबोलती ॥ २६ ॥ ज
गतामाजीमीचश्रेष्ठ ॥ मजहूनिअन्यनसेवरिष्ठ ॥ परस्परह्मणतीमीचश्रेष्ठ ॥ संवाद
करितीयेणेंपरी ॥ २७ ॥ देवांसिविचारितीतेकाळीं ॥ आह्मांहूनीकोणबळी ॥ वस
तअसेयाभूमंडळीं ॥ तेआह्मांलागींनिवेदावें ॥ २८ ॥ देवह्मणतीब्रह्मविष्णूसी ॥ शं
करश्रेष्ठअसेकैलासीं ॥ ऐशाऐकतांवचनासी ॥ विधिवैकुंठक्रोधावले ॥ २९ ॥ निंदा
करितीशंकराची ॥ उरगभूषणेंअसतीत्याचीं ॥ आवडीअसेस्मशानाची ॥ तयानी
चाकारणें ॥ ३० ॥ ऐसेंबोलोनियांवचन ॥ विधीचेंपंचमशिरकरीगर्जन ॥ तोंध्व
नीशिवेंऐकोन ॥ क्रोधायमानजाहला ॥ भयंकरधरिलीआकृती ॥ तयातेंभैरवना
मनिश्चिती ॥ जींइंद्रियेंअपराधकरिती ॥ तयांचानाशकरीतसे ॥ ३१ ॥ ब्रह्मदेवाचें
पंचमशिर ॥ नखेंछेदिताझालाशंकर ॥ तात्काळजाहलाहाहाःकार ॥ गर्वरहितहोय
ब्रह्मा ॥ ३२ ॥ भीमातीर्थाचियेतीरीं ॥ भैरवयेवोनिवास्तव्यकरी ॥ नामेंभैरवतीर्थ
निर्धारीं ॥ प्रसिद्धतेथेंजाहलें ॥ ३३ ॥ तेथेंकरितीस्नानदान ॥ जेकरितीभक्तीकरू
न ॥ तयांचेहेतूसंपूर्ण ॥ पूर्णहोतीतात्काळीं ॥ ३४ ॥ तेथेंअसेकोटिलिंग ॥ तेथेंजे
करितीकर्मसांग ॥ तयांतेंसौख्यलागवेग ॥ प्राप्तहोईनिर्धारीं ॥ ३५ ॥ त्याकोटीश्व
रेंजाण ॥ क्षेत्रचिखलनामकस्थापून ॥ तेथेंवासकरीआपण ॥ महानंदेंकरूनियां ॥

॥ ३६ ॥ नारदह्मणेब्रह्मदेवासी ॥ कोटीश्वरेंकांस्थापिलंक्षेत्रासी ॥ सांगामजत्याइ
तिहासासी ॥ विचारीतसेंनम्रत्वें ॥ ३७ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ त्याचिखलना
मकस्थानासी ॥ पृथ्वीपतीचिखलपरियेसीं ॥ तपाचरणकरीतसे ॥ ३८ ॥ कोटीश्व
राचेंकरीध्यान ॥ तपकरीतसेदारुण ॥ कोटिलिंगजालेंप्रसन्न ॥ वरमागह्मणेत्यातें ॥
॥ ३९ ॥ जरीप्रसन्नझालासीदेवा ॥ मजलागींऐसावरद्यावा ॥ ममनामेंग्रामप्रसिद्ध
व्हावा ॥ तीर्थहीव्हावेंतैसेंची ॥ ४० ॥ तथास्तुह्मणेकोटेश्वर ॥ ऐसादेवोनितयावर
अंतर्धानपावेसत्वर ॥ सूतह्मणेशौनकादिकां ॥ ४१ ॥ तेस्थानींजेस्नानकरिती ॥
तयांभुक्तिमुक्तीप्राप्तहोती ॥ दर्शनेंमिळेविपुलसंपत्ती ॥ अखिलसौख्यप्राप्तहोई ॥
॥ ४२ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ विधीनेंसांगीतलेंनारदासी ॥ तेंचरित्रम्यांतुह्मां
सी ॥ यथामतीनिवेदिलें ॥ ४३ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तै
सेंचिदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ४४ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्ग
त भीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ कूर्मतीर्थहनुमत्तीर्थभैरवतीर्थकोटीश्वरती
र्थमहिमावर्णनंनामत्रयस्त्रिंशत्तमाध्यायगोडह्रा ॥ ३३ ॥ ओंव्यासंख्या ॥ २०३५ ॥





## अध्याय ३४ वा.






श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ [illegible] श्वराभ्यांनमः ॥

ॐनमोजीभक्तजनतारका ॥ अनादिसिद्धाभवभयहारका ॥ जनंतवेषामायाचक्रचाळका ॥ १ ॥ ज्योतिर्मयस्वरूपाआदिपुरुषा ॥ आनंदविलासाशुद्धमानसा ॥ अखिलजगव्यापकाविश्वेशा ॥ स्कंदताताजगद्गुरो ॥ २ ॥ नीलकंठाप्रसन्नवदना ॥ त्रिपुरांतकादक्षक्रतुमथना ॥ मदमत्सरकाननदहना ॥ जन्ममरणमोचकातुजनमो ॥ ३ ॥ वृषभवाहनाअंधकमर्दना ॥ विश्वेशाहेमायापाशविमोचना ॥ त्रिभुवनेशापार्वतीरमणा ॥ दैत्यमर्दनाकृपानिधे ॥ ४ ॥ भक्तमानसकुंजरअनिवार ॥ नावरेकधींहीसाचार ॥ विवेकांकुशनिर्धार ॥ आवरायाधरियेला ॥ ५ ॥ हातींशोभेलीलाकमळ ॥ जेंनकोमेजेकदाकाळ ॥ तेणेंचपूजीभक्तप्रेमळ ॥ भक्तियुक्तनिरंतर ॥ ६ ॥ सूतह्मणेअहोऋषीश्वर ॥ भीमाशंकरींनृसिंहपुर ॥ तेथेंनीरासंगमअसेथोर ॥ पापनाशकप्रसिद्ध ॥ ७ ॥ तयाचाइतिहासकराश्रवण ॥ अखिलपापांचेंहोयनिरसन ॥ एकऋषीश्यावाश्वयानामान ॥ कृतयुगींअसताझाला ॥ ८ ॥ विधीह्मणेनारदातें ॥ मत्पदप्राप्तीव्हावयातें ॥ करिताझालाउग्रतपातें ॥ महत्प्रयत्नेंकरूनियां ॥ ९ ॥ श्यावाश्वऋषीकरीतपाचरण ॥ हेंइंद्रासिकळलेंवर्तमान ॥ भयभीतझालेंअंतःकरण ॥ विचारकरीमानसीं ॥ १० ॥ विचारवंतांसिबोलावून ॥ तयांसीसांगेवर्तमान ॥ श्यावाश्वकरीतपाचरण ॥ शंकरप्रसन्नहोईलत्यातें ॥ ११ ॥ प्रसन्नहोतांपिनाकधर ॥ कोणतादे

 ईलनकळेवर ॥ यासीकोणताकरावाविचार ॥ हेंमजसीसुचेना ॥ १२ ॥ सभाजन 
सांगतीइंद्रातें ॥ करावेंतयाच्यातपोभंगातें ॥ ऐशाऐकतांवचनातें ॥ इंद्रमानसींसं
 तोषला ॥ १३ ॥ नीरानामकअप्सरेसी ॥ बोलावोनिकरीआज्ञेसी ॥ त्वांजावोनि 
भीमाशंकरासी ॥ तपोभंगकरींऋषीचा ॥ १४ ॥ ऐसेंऐकोनिइंद्रवचन ॥ भीमाशं
करींकरीगमन ॥ ऋषीचेसमीपजाऊन ॥ नृत्यगायनकरीतसे ॥ १५ ॥ हावभावप्रे
मेंकरी ॥ भ्रुकुटीमुरडोनिनेत्रमारी ॥ तपोभंगासीयत्नकरी ॥ नानाप्रयासेंकरोनि
यां ॥ १६ ॥ अवलोकितांअप्सरेसी ॥ क्रोधायमानजाहलाऋषी ॥ शापदेताझाला
तियेसी ॥ नदीरूपहोईंतूं ॥ १७ ॥ तात्काळजाहलेंनदीरूप ॥ वाहोंलागलीआपें
आप ॥ भीमेसीसंगमजाहलापाप ॥ नाशनकरावयाजगाचें ॥ १८ ॥ तेथेंजेकरिती
स्नानदान ॥ मुक्तीप्राप्तहोईतयांलागून ॥ ब्रह्मदेवसांगेनारदाकारण ॥ पुढेंइतिहास
श्रवणकरीं ॥१९॥ त्यासंगमाचियेस्थानीं ॥ नृसिंहतीर्थअसेअघनाशनी ॥ तयाचा
इतिहासतुजलागुनी ॥ सांगतोंऐकभक्तीनें ॥ २० ॥ हिरण्यकशिपूनामकदैत्य ॥
असताजाहलाउन्मत्त ॥ सर्वदेवांसीजिंकित ॥ स्वपराक्रमेंकरोनियां ॥ २१ ॥ द्वेष
करींतोविष्णुभक्तांसी ॥ शिक्षाकरीविष्णुसेवकांसी ॥ येणेंप्रकारेंविष्णूसीद्वेषी ॥ म 
हाक्रूरदुष्टतो ॥ २२ ॥ ऐसेंसमजतांविष्णूसी ॥ [illegible] स्तंभासी ॥ प्रगटहो
वोनिक्रोधेंसी ॥ हिरण्यकशिपूतेंवधिताझाला ॥ [illegible] ाहेलेदुष्टराक्षस ॥

त्यांचाकरिताझालानाश ॥ सौख्यजाहलेंविष्णु[illegible] [illegible]रितीदृढतर ॥२४
त्याभीमानीरासंगमीं ॥ जेस्नानकरितीसप्रेम[illegible] ॥ त[illegible]सास्थानशिव[illegible]धामीं ॥
अक्षयीप्राप्तहोतसे ॥ २५ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ विधीनेंसांगीतलेंनारदासी॥
तेंचरित्रम्यांतुह्मांसी ॥ यथामतीनिवेदिलें ॥ २६ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रं
थाचेंलेखन ॥ तैसेंचदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ २७ ॥ इतिश्रीपद्मपुराणे
उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ भीमानीरासंगमनृसिंह
तीर्थमहिमावर्णनंनामचतुस्त्रिंशाध्यायगोडह्वा ॥ ३४ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥२०६२ ॥



॥ इति श्रीभीमामाहात्म्ये
चतुस्त्रिंशाध्यायः ॥

अध्याय ३५ वा.






श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ ॐनमोजीमायाचक्रचाळ
का ॥ विश्वपतेजगन्नायका ॥ सर्वातीताजगद्रक्षका ॥ दानवमर्दनादयानिधे ॥ १ ॥
मदनांतकमनमोहना ॥ मदमत्सरकाननदहना ॥ हेमायापाशनिकृंतना ॥ पार्वतीर
मणातुजनमो ॥ २ ॥ सूतसांगेशौनकादिकांसी ॥ पुढेंकराचरित्रश्रवणासी ॥ विधि
कथितसेनारदासी ॥ पुंडरीकतीर्थमाहात्म्य ॥ ३ ॥ जेथेंचंद्रभागावसे ॥ पुष्पावती
चासंगमअसे ॥ कुंडलतीर्थहीशोभतसे ॥ देदीप्यमानसर्वदा ॥ ४ ॥ जयासीह्मण
तीपद्माल ॥ जेथेंदेवअसेविठ्ठल ॥ चंद्रभागास्नाननिर्मळ ॥ मोक्षदायकहोतसे ॥ ५ ॥
तयाचेठाईंस्नानदान ॥ जोकरीलपितृतर्पण ॥ भक्तीनेंकरितांआचरण ॥ पुनर्जन्मनो
हेतया ॥ ६ ॥ योग्यपात्रींदेतांदान ॥ तैसेंचिकरितांअनुष्ठान ॥ पुनर्जन्मनोहेतयां
लागुन ॥ सत्यसत्यत्रिवाचा ॥ ७ ॥ पुष्पावतीचियेस्थानीं ॥ पुंडरीकनामामहा
मुनी ॥ ब्रह्मचर्यधारणकरोनी ॥ उग्रतपकरीतसे ॥ ८ ॥ बहुतकालपर्यंत ॥ एक
निष्ठेंपितृसेवनकरित ॥ कृष्णासीमानसींनिरंतरध्यात ॥ पुंडरीकमहात्मा ॥ ९ ॥ पां
चवर्षांचामुरारी ॥ आलापुंडरीकाश्रमाभीतरी ॥ पुंडरीकआनंदलाअंतरीं ॥ साष्टां
गनमनकरीतसे ॥ १० ॥ दंडवतूनमस्कारकरोनी ॥ सद्गदजाहलाअंतःकरणीं ॥ वि
श्वंभराचेलागोनिचरणीं ॥ स्तुतीकरिताजाहला ॥ ११ ॥ कमलाकारहस्तजयाचे ॥
कमलावल्लभनामसाचें ॥ मत्स्यरूपअसेज्याचें ॥ तयातुजसीनमस्कार ॥ १२ ॥

 विश्वाचेंजोभरणकरी ॥ गोवर्धनधरीहस्तावरी ॥ वराहरूपेंदैत्यसंहारी ॥ तयातुज 
सीनमस्कार ॥ १३ ॥ कौस्तुभशोभेहृदयावरी ॥ वेदांतवेद्यह्मणतीमुरारी ॥ श्रीव
 त्सलांछनजोधारणकरी ॥ तयातुजसीनमस्कार ॥ १४ ॥ येणेंपरीकरितांस्तवन ॥ 
श्रीकृष्णजाहलाप्रसन्न ॥ ह्मणेमागेंवरदान ॥ प्रसन्नजाहलोंतुजसीमी ॥ १५ ॥ त्वां
केलेंसीपितृसेवन ॥ जोवरइच्छीतुझेंअंतःकरण ॥ तोघेईंसत्वरीमागोन ॥ पुंडरीक
ब्राह्मणा ॥ १६ ॥ पुंडरीकह्मणेश्रीकृष्णासी ॥ त्वांयाचिस्वरूपेंयेस्थानासी ॥ वास
करावाअहर्निशी ॥ आनंदयुक्तमनानें ॥ १७ ॥ तुझेमानसींजैसाहेत ॥ तैसाचिसि
द्धहोईलत्वरित ॥ आपणराहोनियांतेथ ॥ पंढरीक्षेत्रनिर्मिलें ॥ १८ ॥ नामधारणके
लेंविठ्ठल ॥ तयाजेसेवितीभक्तप्रेमळ ॥ तयासींमुक्तीतात्काळ ॥ प्राप्तहोयसर्वदा ॥
॥ १९ ॥ यातीर्थींमीवासकरीं ॥ जेसेवितीनिरंतरीं ॥ तयांसीमुक्तीनिर्धारीं ॥ प्राप्तहो
यनिश्चयें ॥ २० ॥ पुंडरीकह्मणेविठ्ठलासी ॥ विठ्ठलनामकैसेंतुजसी ॥ कायअर्थअ
सेत्यासी ॥ तोमजसर्वसांगावा ॥ २१ ॥ ऐसेंऐकतांपुंडरीकवचन ॥ आनंदयुक्तश्री
कृष्ण ॥ ह्मणेनिश्चलचित्तेंकरींश्रवण ॥ पुंडरीकब्राह्मणा ॥ २२ ॥ विह्मणजेविज्ञान॥
ठह्मणजेअज्ञान ॥ लह्मणजेदूरकरीन ॥ ह्मणोनीविठ्ठलनाममाझें ॥ २३ ॥ ऐसाऐक 
तांनामार्थ ॥ पुंडरीकबैसलातेथ ॥ विठ्ठलासीहृदयींध्यात ॥ अनन्यभावेंकरूनियां
॥ २४ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ विठ्ठलराहिलापंढरीसी ॥ जयाच्याघेतांदर्शना

सी ॥ मुक्तीतात्काळप्राप्तहोय ॥ २५ ॥ तेहेतीसकोटीदेवांसी ॥ नमस्कारकरि
तांपरियेसीं ॥ जितुकेंपुण्ययेईह्मातासी ॥ तितुकेंएकवारनमितांविठ्ठला ॥ २६ ॥ आ
षाढाचेशुक्लपक्षीं ॥ प्राप्तहोतांएकादशी ॥ प्रेमेंजावेंपंढरीसी ॥ दर्शनघ्यावेंविठ्ठलाचें ॥
॥ २७ ॥ विठोबाचेंदर्शनघेतां ॥ पुनर्जन्मनोहेमागुता॥सौख्यप्राप्तहोयसंतां ॥ से
वाकरितांविठ्ठलाची.॥ २८ ॥ तेदिवसापासोनितेथं ॥ प्रसिद्धजाहलेंपुंडलीकतीर्थ ॥
तैसेंचिदुसरेंचंद्रभागातीर्थ ॥ स्नानेंपावनकरीजगा ॥ २९ ॥ स्वर्गीवासकरितीसुरव
र ॥ तेहीयेवोनिपंढरीक्षेत्र ॥ वासकरितीनिरंतर ॥ सेवाकरितीविठ्ठलाची ॥ ३० ॥
गुरुदारगांमींजोनर ॥ पंढरीवासकरीनिरंतर ॥ तयालागींमुक्तीसाचार ॥ प्राप्तहोतीनि
र्धारें ॥ ३१ ॥ चंद्रभागेंतकरितांस्नान ॥ विठ्ठलाचेंघेतांदर्शन ॥ तयासीप्राप्तवैकुंठ
स्थान ॥ संशयनधरावामानसीं ॥ ३२ ॥ तेथेंकरितांपितृतर्पण ॥ तैसेंचिकरितांश्रा
द्धदान ॥ तयासीप्राप्तमोक्षस्थान ॥ संशयनसेमानसीं ॥३३॥ तेथेंचिअसेब्रह्मतीर्थ ॥
जेजेतयातेंसेवित ॥ तेचिजाणावेजीवन्मुक्त ॥ जगामाजीवंद्यअसती ॥ ३४ ॥ नृ
सिंहरूपीपरमेश्वर ॥ जाहलाअश्वत्थतरुवर ॥ तयाचीसेवाकरितांनिरंतर ॥ सर्वहे
तुपूर्णहोती ॥ ३५ ॥ येणेंप्रकारेंकरोन ॥ पुढेंचरित्रहोईलजाण ॥ नारदह्मणेब्रह्मदे
वाकारण ॥ पुढेंभविष्यमजसांगा ॥ ३६ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ करींपुढीलभ
विष्यश्रवणासी ॥ प्राप्तिहोतांकलियुगासी॥ अनाचारप्रवर्तेल ॥ ३७ ॥ बंधुबंधुद्वेष

करिती॥पितरांतेंनिरंतरनिंदिती॥सापिंडाचेंमुखहीनपाहती॥कलिप्रभावेंकरूनी॥३८
अखिलविद्यासांगेगुरु॥त्याचाअपमानकरितीनरू॥ब्राह्मणभक्तिपुण्यथोरू॥सर्वथामुक
तीतयातें॥३९॥अनाचारेंकरूनजाण॥अथवाचौर्यकर्मेंकरून ॥ प्राप्तकरूनघेतीधन ॥
विचारनकरितीलयोग्यायोग्य ॥ ४० ॥ व्यवहारींअसत्यबोलती ॥ साक्षीहीअसत्य
देती ॥ शुचित्वाचात्यागकरिती ॥ कलिप्रभावें ॥ ४१ ॥ असत्यींहोतीलरममाण ॥
परस्त्रियेसीआसक्तमन ॥दयाधर्मांचेंनिरसन ॥होईलकलिप्रभावें॥४२॥स्त्रियाहोवो
निउन्मत्त ॥पतींचीमानखंडणाकरित ॥ तयांतेंनानाप्रकारेंगांजित ॥ असत्येंकरोनी॥
॥४३॥ स्वधर्मटाकितीलजन ॥ ब्राह्मणसोडितीलवेदपठण ॥ शास्त्राध्ययनसोडोन॥दु
राचारेंवर्ततील॥४४॥अग्निहोत्रादिककर्में ॥ नष्टहोतीलअधर्में॥ ब्राह्मणवर्ततीलकुकर्में
कलिप्रभावेंकरूनियां ॥४५॥ कलियुगामाजींजन॥आपुलास्वधर्मटाकोन ॥ परध
र्माचेंकरितीलग्रहण ॥ परमप्रीतीकरूनियां ॥ ४६ ॥ येणेंप्रकारेंअधर्मकरून ॥ शे
वटींप्रलयहोईलजाण ॥ सर्वलोकरहितसंतान ॥ नाशपावतीअधर्में ॥ ४७ ॥ जेजे
असतीकामीजन ॥ आपुलाधर्मदेतीसोडून ॥ धूर्तकपटीचोरजाण ॥ ब्रह्मज्ञानवदती
मुखें ॥ ४८ ॥ द्रव्यकरितांअवलोकन ॥ लोभउत्पन्नहोईजनांलागून ॥ होईलतितु
काप्रयत्नकरून ॥ द्रव्यहरणइच्छिती ॥ ४९ ॥ द्रव्यलोभीजेपापीजन ॥ द्रव्यघेऊ
निकरितीकन्यादान ॥ कन्याशुल्केंउपजीवन ॥ पापीजनकरिताती ॥ ५० ॥ जया

सीजातकादिसंस्कार ॥ नजाहलातोऽन्यर्थनर ॥ त्याचेंजननर्निःसार ॥ निश्चयेंजा
ण ॥ ५१ ॥ तारुण्येंहोवोनीगर्वित ॥ स्वधर्माचात्यागकरित ॥ अधर्मश्रेष्ठमानित ॥
पापीजन ॥ ५२ ॥ सकळवर्णमिळोन ॥ कलियुगामाजीहोईलमेलन ॥ संपूर्णधर्म
एकधर्महोऊन ॥ राहाटतीलकलियुगीं ॥ ५३ ॥ मंत्रहीनहोतीलब्राह्मण ॥ अल्पा
युप्रजाहोईलजाण ॥ व्रतीदंडीसंन्यासीसंपूर्ण ॥ यांतंगृहनसुटेल ॥५४॥ ऐसाप्रकार
चालतां ॥ ब्राह्मणांलागींप्राप्तदीनता ॥ त्यांहींआपुलाधर्मसोडितां ॥ शूद्रधर्मैराहट
ती ॥ ५५ ॥ शूद्रआचरितीब्राह्मणधर्म ॥ सोडोनिदेतीलस्वधर्म ॥ काढोनियांवर्म
कर्म ॥ ब्राह्मणातेंनिंदितील ॥ ५६ ॥ परमपापीजेचांडाळ ॥ त्यांचाधर्मब्राह्मणांआ
वडेल ॥ ऐसेंकलियुगहोतांप्रबळ ॥ अधर्महोईल ॥ ५७ ॥ रसातळींजातीमेघजा
ण ॥ पृथ्वीदेईलअल्पधान्य ॥ अल्पदुग्धधेनूहोऊन ॥ थोडींपुष्पेंयेतीलवृक्षां ॥ ५८
कलियुगींरोगिष्ठहोतीलजन ॥ मदगर्वितद्रव्यहीन ॥ स्वल्पहोतांप्राप्तधन ॥ कुमा
र्गेंहीवर्तती ॥ ५९ ॥ पाखांडीहोतीलसर्वजन ॥ वेदशास्त्रांनदेतीमान ॥ सर्वबलही
नहोवोन ॥ पापबुद्धीधरीतील ॥ ६० ॥ प्रियहोईलपरान्न ॥ अखिलब्राह्मणांलागून ॥
भगवेंवस्त्रधारणकरून ॥ कापटयसंन्यासघेतील ॥ ६१ ॥ विश्वासहीनब्राह्मण ॥
वेदविक्रयेंउपजीवन ॥ प्राप्तहोतांअल्पधन ॥ गर्वयुक्तहोतील ॥ ६२ ॥ दयाही
नसंपूर्णजन ॥ दांभिककरितीआचरण ॥ लोकांदावितीब्रह्मकर्मानुष्ठान ॥ परंतुस

र्व्यर्थची ॥ ६३ ॥ कोणीयज्ञअथवादान ॥ धर्मात्माकरूंलागेआचरण ॥ तात्काळ
तयातेंकरितीविघ्न ॥ पापीनर ॥ ६४ ॥ कोणीकरीलस्वधर्माचरण ॥ तयातेंह्मणती
दांभीकजाण ॥ ढोंगकरितोसंपूर्ण ॥ लोकांलागींदावाया ॥ ६५ ॥ ब्रह्मदेवह्मणेना
रदासीं ॥ पुढीलभविष्यसांगीतलेंतुजसी ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ सत्कर्मींबु
द्धीधरावी ॥ ६६ ॥ रामाश्रयेंकरूनजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचदत्तकृपेन ॥
केलेंअसेमान्यअसो ॥ ६७ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूत
कथितकथाकल्पतरौ पुंडरीकतीर्थचंद्रभागाकुंडलतीर्थपुष्पावतीसंगम पंढरीमाहा
त्म्यकलियुगअधर्मवर्णनंनामपंचत्रिंशत्तमाध्यायगोडहा ॥ ३५ ॥ ॥ ॥

॥ ओंव्यासंख्या ॥ २१२९ ॥



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ ॐनमोजीपार्वतीरमणा ॥ भक्तजनांच्याध्येयध्याना ॥ मायातीतानिर्गुणा ॥ जगज्जीवनामहेशा ॥ १ ॥ सर्वांचातूंप्राणसखा ॥ उदधिमंथनींप्राशिलेंविखा ॥ तुजअपमानितांदक्षमखा ॥ विध्वंसिलेंक्षणांत ॥ २ ॥ तूंअससीमहाभाग ॥ धारणकरिसीध्यानयोग ॥ तूंतेंस्मरतांलागवेग ॥ चारीमुक्तियेतीहाता ॥ ३ ॥ तुझेस्मरणेंनासेअघं[1] ॥ तवसेवकांनबाधेअघं[2] ॥ नृपतीकरितीनिर्विघ्नअघं[3] ॥ सहायेंकरूनितूझिया ॥ ४ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसाची ॥ महिमाश्रवणकरातीर्थांची ॥ ब्रह्मदेवनारदमुनींची ॥ इच्छापूर्णकरीतसे ॥ ५ ॥ मातृतीर्थाचेंमहिमान ॥ नारदाकरींएकचित्तेंश्रवण ॥ संपूर्णहोतीलहेतुपूर्ण ॥ सत्यसत्यनिर्धारें ॥ ६ ॥ तयाचेंकरितांचिस्मरण ॥ मनेच्छाहोईलपरिपूर्ण ॥ मानसींकरीलनिरंतरध्यान ॥ तयासीमुक्तिहोईलप्राप्त ॥ ७ ॥ कोणेऐकेकाळींसुर ॥ युद्धासीयेवोनिअसुर ॥ भयंकरकरितीसमर ॥ जयेच्छावसेदोहींकडे ॥ ८ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ ऐशापाहोनिप्रसंगासी ॥ म्यांबरोबरीघेवोनिदेवांसी ॥ शंकरासीपूजिलें ॥ ९ ॥ नानाविधकरोनिस्तुति ॥ लीनत्वेंशिवासिकेलीनती ॥ तात्काळशंकरद्रवलाचित्तीं ॥ प्रसन्नजाहलाआह्मांतें ॥ १० ॥ प्रसन्नहोवोनियांशंकर ॥ देवांसीह्मणेमागावर ॥ ऐसेंऐकतांआनंदलेसुर ॥ बोलतेझालेशंकरासी ॥ ११ ॥

---

१ पाप. २ जन्म मरणा दिदुःख ३ मृगयादिव्यापार.

आह्मासीजिंकिलेंअसुरीं ॥ आमुचेंसामर्थ्यनचालेसमरीं ॥ तरीआह्मासीसाह्यकरी॥
जगत्पालकामहेशा ॥ १२ ॥ ऐसेंऐकतांदेववचन ॥ युद्धासिनिघालापंचवदन ॥ स
मरींदैत्यांसियुद्धकरून ॥ श्रांतजाहलाअंतःकरणीं ॥ १३ ॥ शंकराचेकंठापासोन ॥
स्वेदबिंदूपावलेपतन ॥ तेथेंदेवीजाहल्याउत्पन्न ॥ युद्धकरितीदैत्यांसी ॥ १४ ॥ स
मरींकरूनदैत्यहनन ॥ रसातळींकेलेंगमन ॥ तेथेंमातृतीर्थजाहलेंउत्पन्न ॥ मातृ
लिंगजाहलें ॥ १५ ॥ तेथेंकरितांस्नानदान ॥ सर्वहेतूहोतीपूर्ण ॥ तयाचेंकरितांह्र
दयींध्यान ॥ भुक्तिमुक्तीलाधती ॥ १६ ॥ तेथेंचिअसतीअन्यतीर्थें ॥ सेवनकरितां
भक्तियुक्तें ॥ पूर्णहोतीसर्वइच्छितें ॥ चरित्रश्रवणकरींत्यांचें ॥ १७ ॥ सूतह्मणेशौन
कादिकांलागून ॥ पूर्वींब्रह्मांगुष्ठापासून ॥ दक्षप्रजापतीजाहलाउत्पन्न ॥ शतकन्याजाह
ल्यातयासी ॥ १८ ॥ शंकरासीदीधलीसती ॥ चंद्रासिदीधल्यासप्तविंशती ॥ कश्यपाला
गोनीत्रयोदशमिती ॥ अवशेषदिधल्यादेवऋषींसी ॥ १९ ॥ शंकरेंघेऊनिसतीसी ॥ गम
नकेलेंकैलासासी ॥ वासकरिताजाहलासौख्येंसी ॥ पार्वतीसींसहवर्तमान ॥ २० ॥ एके
काळींदक्षप्रजापती ॥ भेटावयानिघालाजामाताप्रती ॥ येतांदेखेपशुपती ॥ सन्मानन
करीश्वशुराचा ॥ २१ ॥ ऐसेंकरोनिअवलोकन ॥ दक्षस्वस्थानींयेवोन ॥ मानसींद्वेषधरू
न ॥ मुखनावलोकीजामाताचें ॥ २२ ॥ पुढेंकांहींकालेंकरोन ॥ भीमाशंकरींयेवोन ॥
देवांसिपाठविलेंआमंत्रण ॥ यज्ञआरंभकरिताझाला ॥ २३ ॥ कश्यपादिकसर्वऋ

षींसी ॥ यक्षचारणसिद्धोरगांसी ॥ दिक्पालादिकयज्ञांसी ॥ आमंत्रिलेंसर्वांतें ॥
॥ २४ ॥ मंडपघातलासुशोभित ॥ देवऋषीबैसलेआंत ॥ द्वारपालांचेंपूजनकरित ॥
रमानाथाहीपूजिलें ॥ २५ ॥ ऋत्विजादिकांचेंपूजन ॥ दक्षकरीआनंदोन ॥ यज्ञातें
करीआरंभण ॥ धूम्रेंदिशाव्यापल्या ॥ २६ ॥ धूम्रअवलोकूनिनारदानें ॥ हर्षितजा
हलाआनंदमनें ॥ ह्मणेजावोनिकरावेंसूचने ॥ सतीलागींयेधवां ॥ २७ ॥ स्कंधावरी
असेवीणा ॥ करीतअसेनामस्मरणा ॥ अन्यकांहींनयेमना ॥ शंकरदर्शनावांचोनी ॥
॥ २८ ॥ कैलासपर्वतशोभायुक्त ॥ दृष्टीनेंतेधवांअवलोकित ॥ उंचअसेसर्वपर्वतां
त ॥ शुभ्रअसेचंद्रापरी ॥ २९ ॥ तेथेंयेऊनियांसत्वर ॥ उमायुक्तदेखेशंकर ॥ दंड
वतूकरोनिनमस्कार ॥ स्तुतिकरिताजाहला ॥ ३० ॥ ॐनमोजीजगन्नाथा ॥ गौरी
रमणादक्षजामाता ॥ नमस्कारअसोउमायुक्ता ॥ अनन्यत्वेंकरूनियां ॥ ३१ ॥ ऐ
सेंऐकतांस्तुतिवचन ॥ शंकरजाहलाप्रसन्नमन ॥ पुढेंनारदसांगेवर्तमान ॥ शंकरा
लागींभीमेचें ॥ ३२ ॥ भीमाशंकराचियेठाईं ॥ दक्षप्रजापतीयेवोनी ॥ आरंभिलेंते
णेंयज्ञालागुनी ॥ महोत्साहेंकरूनियां ॥ ३३ ॥ तेणेंबोलाविलेंविष्णूसी ॥ तैसेंचि
संपूर्णदेवांसी ॥ कश्यपादिकसर्वऋषी ॥ सन्मानेंसीबोलाविले ॥ ३४ ॥ तयांचेंक
रूनियांपूजन ॥ दीधलेंतयांसीयोग्यस्थान ॥ कन्याआणिल्यासन्मानून ॥ वस्त्रींभूष
णींगौरविल्या ॥ ३५ ॥ ऐसेंऐकतांनारदवचन ॥ गौरीझालीखिन्नवदन ॥ मजसी

कांनआलेंआमंत्रण ॥ विचारकरीमानसीं ॥ ३६ ॥ गौरीशंकरासिह्मणेतेवेळां ॥
माझाअपमानपित्यानेंकेला ॥ त्याच्यायज्ञाचानाशवहिला ॥ होईलनिश्चयेंकरोनी
॥ ३७ ॥ नेत्रजाहलेखदिरांगार ॥ जेंवीप्रळयवीजथोर ॥ वाटेकरीलत्रिभूवनांचासंहा
र ॥ अल्पकालांतपरियेसा ॥ ३८ ॥ शंकरेंअवलोकिलेंतिजसी ॥ क्रोधेसंतप्तजा
हलीबहुवसी ॥ उपदेशकरिताजाहलातियेसी ॥ सत्कर्मासीविघ्ननकीजे ॥ ३९ ॥
शंकरह्मणेहेसती ॥ क्रोधटाकोनिधरींशांती ॥ सज्जनक्रोधातेंनाशिवती ॥ पुण्यनाश
करीक्रोध ॥ ४० ॥ येणेंपरीपंचवदन ॥ गौरीचेंकरीशांतवन ॥ तथापीनोहेक्रोधशम
न ॥ तैसीचतेथोनीचालिली ॥ ४१ ॥ यज्ञमंडपींप्राप्तहोवोनी ॥ अवलोकिलेंब्रह्मा
चक्रपाणी ॥ स्वाहाकारवषट्कारेंकरोनी ॥ हवनकरितीआनंदें ॥ ४२ ॥ सपत्नीक
बैसलादक्षप्रजापती ॥ एकोनशतकन्याशोभती ॥ जामातहीतेथेंभाती ॥ आनंदें
करोनीबैसले ॥ ४३ ॥ ऐसेंदेखतांयज्ञस्थान ॥ गौरीझालीम्लानवदन ॥ पित्याचे
समीपयेवोन ॥ बोलतीजाहलीतयासी ॥ ४४ ॥ हेपित्यासद्गुणराशी ॥ तूंहीसापत्न
भावधरिशी ॥ कांनबोलाविलेंमजसी ॥ कायकारणसांगेंमज ॥ ४५ ॥ दक्षह्मणेहे
गौरी ॥ कांहींतरीलज्जाधरीं ॥ पतीसिसांडोनियांदूरी ॥ दुष्टेयेथेंकांपातलीस ॥ ४६ ॥
माझेउदरींजन्मघेऊन ॥ कैसीनिर्लज्जजाहलीसपूर्ण ॥ नआमंत्रितांयज्ञमंडपींयेवो
न ॥ मूर्खेंव्यर्थबडबडसी ॥ ४७ ॥ ऐसेंऐकतांदक्षोत्तर ॥ क्रोधेंकांपोलागलीथरार ॥

उर्ध्वबाहूकरोनीसत्वर ॥ क्रोधोत्तरेंबोलोंलागे ॥ ४८ ॥ ब्रह्मादिकदेवगण ॥ प्राप्तजा
हलेआनंदोन॥ऋषीहीकरितातीहवन॥स्वाहाकारेंकरोनी॥४९॥कैसेंहवनहोईलपूर्ण
॥कोणकरीलतुमचेंरक्षण ॥ शिवासांडोनिपातलानारायण ॥ मौनधरोनीकांबैसला॥
॥ ५० ॥ यायज्ञाचेअंतींपूजन ॥ शिवासीयोग्यअसोन ॥ तेंस्थानघ्यावयापाहेनारा
यण ॥ तरीविध्वंसहोईलयज्ञाचा ॥५१॥ ऐसेंबोलोनियांवचन ॥ बाहूऊर्ध्वकरोन ॥
नेत्रगरगरांभवंडोन ॥ कुंडांतउडीटाकिली ॥ ५२ ॥ हेंवर्तमानसमजलेंशंकरासी ॥
तात्काळआलायज्ञमंडपासी ॥ युद्धमांडिलेंदक्षासी ॥ प्रळयथोरवाटतसे ॥ ५३ ॥
तेधवांदक्षाचाघेतलाप्राण ॥ देवांसीपळविलेंदशदिशांलागोन ॥ यज्ञटाकिलाविध्वं
सोन ॥ धूळजाहलीतेस्थानीं ॥ ५४ ॥ धूलखेटनामकतीर्थ ॥ प्रसिद्धजाहलेंअसे
तेथ ॥ तेथेंजोभक्तीनेंस्नानकरित ॥ भुक्तिमुक्तीलाधतीत्या ॥ ५५ ॥ तेथेंकरावेंश्रा
द्धपिंडदान ॥ तैसेंचिकरावेंपितृतर्पण ॥ पितरांसीप्राप्तउत्तमस्थान ॥ निश्चयेंकरूनि
होईल ॥ ५६ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ विधीनेंसांगीतलेंनारदासी ॥ तेंचरि
त्रम्यांतुह्मांसी ॥ यथामतीनिवेदिलें ॥ ५७ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचें
लेखन ॥ तैसेंचदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ५८ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्त
रसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ मातृतीर्थधूलखेटतीर्थमहिमाव
र्णनंनामषट्त्रिंशाध्यायगोडहा ॥ ३६ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ २१८७ ॥

श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीभीमाशंकरायनमः ॥ पार्वतीपरमेश्वराभ्यांनमः ॥ ॐनमोजीज्ञानस्वरूपा ॥ स्मरणकरितांनाशनपापा ॥ जगत्रितयाच्याबापा ॥ सर्वातीतामहेशा ॥ १ ॥ सूतह्मणेशौनकादिकांप्रत ॥ विधीनारदातेंसांगत ॥ ब्रह्मतीर्थमहिमाएकचित्त ॥ श्रवणकरींनारदा ॥ २ ॥ प्रतिष्ठाननगरीचेआंत ॥ खेटकनामाब्राह्मणविख्यात ॥ पालनकरीब्रह्मचर्यव्रत ॥ आनंदेंकरोनसर्वदा ॥ ३ ॥ तेणेंजावोनिभीमाशंकरीं ॥ रहावयाआश्रमथोरी ॥ करोनीतेथेंतपकरी ॥ एकनिष्ठेंकरोनियां ॥ ४ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ तोममध्यानींरतपरियेसीं ॥ मीप्रसन्नहोऊनित्यासी ॥ वरमागऐसेंह्मणितलें ॥ ५ ॥ खेटकह्मणेब्रह्मदेवाकारण ॥ देवाजरीजाहलासीप्रसन्न ॥ तरीतुझेनामेंहेंस्थान ॥ प्रसिद्धव्हावेंतीर्थेकीं ॥ ६ ॥ ऐसेंऐकतांखेटकवचन ॥ तयासीदेऊनिवरदान ॥ विधीपावलाअंतर्धान ॥ ब्राह्मणआनंदलामानसीं ॥ ७ ॥ जोकरीलतेथेंस्नान ॥ तयासीमिळेलउत्तमस्थान ॥ दारिद्रदुःखजावोन ॥ सौख्यप्राप्तहोतसे ॥ ८ ॥ तयातीर्थाचेसन्निधानीं ॥ अन्यतीर्थेंअसतीकोटिगुणी ॥ तयांचेजेरतहोतीसेवनीं ॥ भुक्तिमुक्तिप्राप्ततयां ॥ ९ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदातें ॥ ऐकेंश्वेततीर्थमहिमेतें ॥ ज्याचेंसेवनसर्वकामांतें ॥ पूर्णकरीनिश्चयें ॥ १० ॥ वामदेवयानामेंकरून ॥ एकऋषीहोताजाण ॥ विधीतेंकरिताझालाप्रश्न ॥ स्नानसंध्याकेवीकीजे ॥ ११ ॥ ब्रह्मदेवेंसांगतांतयासी ॥ स्नानसंध्येच्या

विधीसी ॥ तेवीकरीआचरणासी ॥ नित्यनेमेंकरूनियां ॥ १२ ॥ तयाचीभार्यासु
रसासती ॥ तिजसहभीमाशंकरींकरीवसती ॥ यज्ञआरंभिलाप्रीती ॥ देवांसंतुष्ट
करावया ॥ १३ ॥ यज्ञआरंभितांअकस्मात ॥ राक्षसतेथेंजाहलाप्राप्त ॥ तयाचा
यज्ञविध्वंसित ॥ क्रूरस्वभावेंकरोनी ॥ १४ ॥ वामदेवह्मणेतयासी ॥ राक्षसामीजा
णतोंतुजसी ॥ ब्राह्मणासहयज्ञसंरक्षीं ॥ कृपाकरोनीयेवढा ॥ १५ ॥ राक्षसबोले
तयातें ॥ मजकरींभीमातीर्थाभिषेकातें ॥ नातरीविध्वंसीनयज्ञातें ॥ निश्चयेंसींजा
णपां ॥ १६ ॥ ऐसेंऐकतांऋषींनींवचन ॥ भीमेचेंउदकआणून ॥ तयासीकरविलें
स्नान ॥ चमत्कारघडलातेथें ॥ १७ ॥ तयाचेंहोतेंस्वरूपकृष्ण ॥ तात्काळशुभ्रजा
हलेंजाण ॥ तेथेंतेदिवसापासोन ॥ श्वेततीर्थजाहलें ॥ १८ ॥ तेथेंकरितांस्नानदान॥
पापाचेंहोईनिरसन ॥ दुःखदारिद्र्यजावोन ॥ सौख्यप्राप्तहोतसे ॥ १९ ॥ तेथेंचिअसेप्र
गाथतीर्थ ॥ सर्वपापाचानाशकरित ॥ तयाच्याऐकेंइतिहासाप्रत ॥ श्रवणेंपापसंहारे ॥
॥ २० ॥ भृगूज्याबालीअर्चन ॥ एकदांसमुदायेंसिबैसोन ॥ करितीपरस्परांतभांडण ॥
कोणतेंकर्मश्रेष्ठअसे ॥ २१ ॥ याचाकरावयानिश्चय ॥ धरावेंशंकराचेपाय ॥
तोसांगेलयाचाप्रत्यय ॥ संशययांतअसेना ॥ २२ ॥ ऐसाविचारकरून ॥ शंकराचें ॥ १ ॥
केलेंपूजन ॥ तात्काळसंशयनिरसन ॥ केलेंअसेशंकरानें ॥ २३ ॥ जेथेंजाहलेंसं
शयनिरसन ॥ तेथेंप्रगाथतीर्थजाहलेंजाण ॥ स्नानदानकरितांप्रेमान ॥ भुक्तिमुक्ती

लाधती ॥ २४ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदाप्रत ॥ आणखीअसेशंखतीर्थ ॥ ऐकेंतयाचेइ
तिहासाप्रत ॥ एकचित्तेंकरूनी ॥ २५ ॥ पूर्वींकृतयुगींजाण ॥ उन्मत्तजाहलेराक्ष
सगण ॥ मजसीकरावयाआलेभक्षण ॥ मीशरणगेलोंविष्णूसी ॥ २६ ॥ विष्णू
होऊनियांप्रसन्न ॥ चक्रेंराक्षसांचेघेतलेप्राण ॥ जयप्राप्तहोताशंखवादन ॥ करिता
झालातेस्थानीं ॥ २७ ॥ तेथेंजाहलेंशंखतीर्थ ॥ सेवनकरितांप्रीतियुक्त ॥ भुक्तिमु
क्तीप्राप्तहोत ॥ दुःखनोहेकदाकाळीं ॥ २८ ॥ आणखीचक्रतीर्थजाण ॥ तयाचेंमाहा
त्म्यकरींश्रवण ॥ जंबूकनामेंकरून ॥ धार्मिकराजाहोताएक ॥ २९ ॥ तेणेंआरंभि
लाअश्वमेध ॥ ब्राह्मणबोलाविलेप्रसिद्ध ॥ राजेहीआलेनानाविध ॥ यज्ञपहावया
कारणें ॥ ३० ॥ तेथेंप्राप्तहोवोनीराक्षस ॥ यज्ञाचाकरितीविध्वंस ॥ राजाशरणगे
लाविष्णूस ॥ सर्ववृत्तनिवेदिलें ॥ ३१ ॥ विष्णूयेऊनियांतेथ ॥ चक्रेंराक्षसशिरेंछे
दित ॥ राजातात्काळजाहलाशांत ॥ यज्ञपूर्णकरिताझाला ॥ ३२ ॥ तेथेंजाहलेंचक्र
तीर्थ ॥ तयाचेंजेसेवनकरित ॥ तयांसीसौख्यप्राप्तहोत ॥ दुःखनबाधेकालत्रयीं ॥
॥ ३३ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ ब्रह्मदेवेंसांगीतलेंनारदासी ॥ तेंमाहात्म्यम्यांतु
ह्मांसी॥यथामतीनिवेदिलें॥३४॥रामाश्रयेंकरूनिजाण ॥याग्रंथाचेंलेखन॥तैसेंचदत्तकृ
पेन॥केलेंअसेमान्यअसो॥ इतिश्रीप०उ०सूत०ब्रह्मतीर्थश्वेततीर्थप्रगाथतीर्थशंखती
र्थचक्रतीर्थमाहात्म्यनिवेदनंनामसप्तत्रिंशत्तमाध्यायगोडहा॥३७ ओंव्यासंख्या२२२१

# अध्याय ३८वा.






श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीशंकरायनमः ॥
ॐनमोजीविश्वनाथा ॥ तुझेचरणींठेवितोंमाथा ॥ तुझीवर्णितीजेकथा ॥ तयांसीमाझा
नमस्कार ॥ १ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ पुढेंऐकाकागिनीसंगमासी ॥ विधीह्म
णेनारदासी ॥ पुढेंचरित्रश्रवणकरीं ॥ २ ॥ कागिनीआणिभीमासंगमासी ॥ जेभ
क्तीनेंकरितीस्नानासी ॥ उत्तमलोकप्राप्ततयांसी ॥ संशयनधरावामानसीं ॥ ३ ॥ ये
विषयींइतिहास ॥ सूतसांगेशौनकादिकांसी ॥ श्रवणकरासावकाश ॥ एकचित्तेंक
रोनियां ॥ ४ ॥ देवराजपुरंदर ॥ तयाचेंअमरावतीनगर ॥ तयाचीअप्सरात्रैलोक्य
सुंदर ॥ कागिनीनामेंएकहोती ॥५॥ तीरममाणझालीदैत्यासी ॥ पिंगळाक्षनामअसे
तयासी ॥ कागिनीनजाईकैलासासी ॥ शंकरदर्शनाकारणें ॥ ६ ॥ ऐसाबहुतकाल
गेला ॥ मनासीउद्वेगजाहला ॥ निघालीजावयादर्शनाला ॥ कैलासासीत्वरेनें ॥७॥
जावोनिशंकराचेसन्निधानीं ॥ लोटांगणघातलेंचरणीं ॥ शंकरबोलेक्रोधवचनीं ॥ कु
ठेंहोतीससांगपां ॥ ८ ॥ इतुकेदिवसकोणतेस्थानीं ॥ वसतहोतीससांगेंमजकार
णीं ॥ तीह्मणेपिंगलाक्षदैत्यालागुनी ॥ रमतहोतेंकामित्वें ॥ ९ ॥ ऐसेंऐकतांकागिनी
वचन ॥ शंकरजाहलाक्रोधायमान ॥ तिजलागींबोलिलाशापवचन ॥ नदीरूपहोईं
तूं॥१०॥ऐसेंभाषणपडतांश्रवणीं॥नदीरूपजाहलेंतिजलागुनी॥भीमाशंकरींयेवोनी॥
भीमेसिसंगमपावली ॥ ११ ॥ तेधवांपासोनिकागिनीसंगमीं ॥ जेस्नानदानकरिती

प्रेमीं ॥ तयांसीस्थानशिवधामीं ॥ प्राप्तहोईलनिर्धारें ॥ १२ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदा
सी ॥ दुसरेंतीर्थपरमेश्वरीनामेंसी ॥ प्रसिद्धअसेत्रिभुवनेंसी ॥ स्मरणमात्रेंपापनाश ॥
॥ १३ ॥ तेथेंकरितांस्नानदान ॥ तैसेंचीश्राद्धतर्पण ॥ तयासीप्राप्तशिवस्थान ॥ स
त्यसत्यत्रिवाचा ॥ १४ ॥ भीमाशंकरालागोन ॥ राजाहोनगोटयानामान ॥ होन
गोटीपुरीस्थापून ॥ राज्यकरीचिरकाल ॥ १५ ॥ तयाहोनगोटीपुरीं ॥ होतीचंद
लापरमेश्वरी ॥ तियेचेंदर्शनघेतांनरीं ॥ संपत्तिमानहोतअसती ॥ १६ ॥ येविषयीं
इतिहास ॥ नारदाश्रवणकरींसावकाश ॥ सूतसांगेशौनकादिकांस ॥ परमेश्वरीच
रित्रश्रवणकरा ॥ १७ ॥ कृष्णानदीचियेतीरीं ॥ मुनीएकहोताजटाधारी ॥ तपश्चर्याक
रीफलाहारी ॥ एकनिष्ठेंकरूनियां ॥ १८ ॥ तयाचाआश्रमपुण्यपावन ॥ फलमूलयुक्त
असेजाण ॥ तेथेंएकराजाससैन्य ॥ ताम्रकांचननामापातला ॥ १९ ॥ पुण्यपावनतोआश्र
म ॥ रायानेंअवलोकिलासप्रेम ॥ तेथेंराहोनियांआराम ॥ घेताझालास्वस्थपणें ॥ २० ॥
ऋषीनेंराजयाकारणें ॥ अवलोकिलादृष्टीनें ॥ बोलेतयासीक्रोधयुक्तमनें ॥ येथेंप्रा
प्तकांझालासी ॥ २१ ॥ तूंयेथेंप्राप्तझाल्याकारण ॥ ममाश्रमनाशजाहलाजाण ॥
ह्मणोनीघेईंशापवचन ॥ दारिद्र्ययुक्तहोशीलतूं ॥ २२ ॥ ऐसेंऐकतांशापवचन ॥ राजा
मानसींजाहलाखिन्न ॥ तयासीबोलताजाहलावचन ॥ नम्रफारहोवोनी ॥ २३ ॥ मी
मृगयाकरूनीश्रमलों ॥ दैववशेंयेस्थानापातलों ॥ विश्रांतीघ्यावयाराहिलों ॥ दो

नघटिकापर्यंत ॥ २४ ॥ अपराधघडिलाचुकोन ॥ मजलागींद्यावेंउःशापवचन ॥
ऐसेंऐकतांऋषीचेंमन ॥ कृपायुक्तजाहलें ॥ २५ ॥ शयासीसांगेमुनीश्वर ॥ त्वांभी
माशंकरींजावोनिसत्वर ॥ चंदलापरमेश्वरीचेंपूजनकर ॥ संपत्तीप्राप्तहोईलतुजसी ॥
॥ २६ ॥ पुढेंस्मरूनऋषीचेंवचन ॥ चंदलापरमेश्वरीसीयेवोन ॥ आपुल्यास्त्रियेसीं
सहवर्तमान ॥ पूजनकरीदेवीचें ॥ २७ ॥ ऋषीचाशापहोतांतत्क्षणीं ॥ प्राप्तजाहला
स्वराष्ट्रलागुनी ॥ तोंराज्यघेतलेंहिरोनी ॥ दायादादिकींप्रयत्नें ॥ २८ ॥ देवीचीक
रीतसेस्तुती ॥ ह्मणेतुझीऐकोनिआलोंकीर्ति ॥ प्रसन्नहोवोनियांमजप्रती ॥ हेतुपू
र्णकरींमाझा ॥ २९ ॥ ऐसेंऐकतांनृपवचन ॥ देवीप्रसन्नझालीत्याकारण ॥ तयाची
मनकामनापूर्ण ॥ करितीझालीतात्काळ ॥ ३० ॥ त्याचंदलापरमेश्वरीप्रती ॥ तै
सेंचिपरमेश्वरीतीर्थी ॥ जेभक्तीनेंसेवनकरिती ॥ तयांसीमुक्तीप्राप्तहोई ॥ ३१ ॥
सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ विधीनेंसांगीतलेंनारदासी ॥ तेंचरित्रम्यांतुह्मांसी ॥ य
थामतीनिवेदिलें ॥ ३२ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचदत्त
कृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ३३ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमा
चरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ कागिनीतीर्थसंगमपरमेश्वरीतीर्थमहिमावर्णनंना
मअष्टत्रिंशाध्यायगोड़हा ॥ ३८ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥ २२५४ ॥ ॥

॥ इति श्रीभीमामाहात्म्ये
अष्टत्रिंशाध्यायः ॥

श्रीगणेशायनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीपार्वतीपरमेश्वराभ्यां नमः ॥ ॐनमोजीगजचर्मवसना ॥ स्मशानवासियासर्पभूषणा ॥ रामप्रियापार्वती रमणा ॥ विश्वचालकाआनंदमया ॥ १ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ ब्रह्मदेवसांगेनारदासी ॥ श्रवणकरींभवानीतीर्थमहिमेसी ॥ सर्वपापाचेंनाशक ॥ २ ॥ पूर्वी कृतयुगाचेठायीं ॥ सन्नतीनामकराजापाहीं ॥ पुत्रबिडौजायामही ॥ स्वनामेंपुरीरचिताझाला ॥ ३ ॥ सनतीयानामेंकरून ॥ पुरीदिसेतीरममाण ॥ राजाराज्यकरीसुजाण ॥ प्रजापाळीपुत्रापरी ॥ ४ ॥ तयासनतीनगरीं ॥ भवानीचंदलापरमेश्वरी ॥ तिचेंदर्शनघेतांनरनारी ॥ इहपरत्रसाधिती ॥ ५ ॥ नारदह्मणेब्रह्मदेवासी ॥ चंदलाभवानीजाह्लीकैसी ॥ तेंसविस्तरवृत्तमजसी ॥ कृपेकरूनीसांगावें ॥ ६ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदासी ॥ नागलोकींशेषकन्यापरियेसीं ॥ स्वरूपेंसुंदरजाह्लीवयसी ॥ विवाहचिंताशेषकरी ॥ ७ ॥ पित्यासीचिंताआपुल्याकारण ॥ हेंकन्येनेंमनींजाणोन ॥ तयासीबोलेमृदुवचन ॥ इंद्रपतीवरीनमी ॥ ८ ॥ तयावांचोनिअन्यपुरुषासी ॥ मी नवरीननिश्चयेंसी ॥ तरीजावोनिभीमाशंकरासी ॥ तपाचरणकरितेंमी ॥ ९ ॥ ऐसें ऐकतांकन्यावचन ॥ तिजसीदिधलेंअनुमोदन ॥ तीभीमाशंकरींयेवोन ॥ तपारंभकरितीझाली ॥ १० ॥ इंद्राचेंमानसींकरीध्यान ॥ इंद्रजाह्लाप्रसन्न ॥ ह्मणेमागेंवरदान ॥ प्रसन्नअसेंमींतुजलागीं ॥ ११ ॥ तीह्मणेइंद्राकारण ॥ जरीजाह्लासीप्रसन्न ॥

तरीएवढेंचिदेईंवरदान ॥ पतीहोईंतूंमाझा ॥ १२ ॥ ऐसेंऐकतांतियेचेंवचन ॥ इंद्र
सांगेतिजलागून ॥ सर्वहेतूतुझेइच्छेप्रमाण ॥ पूर्णहोतीलनिर्धारें ॥ १३ ॥ नागक
॥ १ ॥ न्येशींसहवर्तमान ॥ कांहींकालभीमातीर्थींराहून ॥ पुत्रकरिताजाहलाउत्पन्न ॥ सेतु ॥३१॥
राजनामत्याचें ॥१४॥ तोसेतुराजनृपती ॥ सर्वराजेजिंकूनत्वरितगती ॥ सर्वपृथ्वी
चाझालापती ॥ प्रजारंजनकरीतसे ॥ १५॥ राजाअसेविनयसंपन्न ॥ तयापत्नीअसे
स्वरूपवान ॥ पुत्रअसतीशौर्यसंपन्न ॥ इंद्रप्रसादेंकरूनियां ॥ १६ ॥ नित्यकरीवि
ष्णुध्यान ॥ परीविपरीतबुद्धीपूर्वकर्मान ॥ नित्यनूतननारीआणोन ॥ उपभोगीतसे
कामित्वें ॥ १७ ॥ रोजदूतकरीदेशभ्रमण ॥ जेथेंनूतननारीअसेंपाहून ॥ आणोनि
देतीराजालागून ॥ ऐसाक्रमचालिला ॥ १८ ॥ इतुक्यांतएकदूतयेवोन ॥ राजास
सांगेवर्तमान ॥ एकमुनीआलानारायण ॥ तयाजवळीरत्नेंदोनी ॥ १९ ॥ एकरत्न
सिद्धपादुकाजाण ॥ दुसरीस्त्रीमनमोहन ॥ आह्मांनकळेतियेचेंवर्तमान ॥ कोठील
कोणअसेती ॥ २० ॥ नागकन्याकींअप्सरा ॥ हेंआह्मांनकळेप्रजेश्वरा ॥ पत्नीयो
ग्यनसेमुनीश्वरा ॥ कोणकोठीलसमजेना ॥ २१ ॥ ऐसेंऐकतांदूतवचन ॥ राजा
जाहलाव्याप्तमदन ॥ मुनीचेआश्रमींकरीगमन ॥ आनंदयुक्तचित्तेंसी ॥२२॥ समि ॥ ३ ॥
धाआणावयाकारण ॥ ऋषीगेलावनालागुन ॥ ऐसाअवसरपाहोन ॥ चंद्रलाहरण

---

१ ऋषिपत्नी.

करिताझाला ॥ २३ ॥ तिजसीनेऊनियांग्रामांत ॥ शिवालयींबैसवित ॥ तेथेंरक्ष
कांठेवीत ॥ रक्षणकरावयातियेचें ॥ २४ ॥ सेवकरक्षणकरितीतिजसी ॥ राजाबै
सलाअंतभागासी ॥ बोलताझालातियेसी ॥ वशहोईंतूंसत्वर ॥ २५ ॥ ऋषिपत्नी
बोलेत्याकारण ॥ हेनृपतेदयाघन ॥ मीआहेंव्रतस्थजाण ॥ पक्षव्रतजाणहें ॥२६॥
ऐसेंऐकतांतियेचेंवचन ॥ राजाजाहलाखिन्नमन ॥ विचारयुक्तअंतःकरण ॥ जाह
लेंअसेरायाचें ॥ २७ ॥ तीस्त्रीजावोनिशिवाजवळी ॥ हेशंकराचंद्रमौळी ॥ दै
त्यसंहारअवलीळी ॥ करितोसिक्षणार्धें ॥ २८ ॥ तियेचीस्तुतीऐकतां ॥ शिव
जाहलाआनंदचित्ता ॥ तिजसीजाहलाबोलता ॥ वरमागजोइच्छिशी ॥ २९ ॥
शंकरजाहलाप्रसन्न ॥ ऐसेंचंद्रलेनेंअवलोकून ॥हापक्षनहोतांपूर्ण ॥ पतीयावागृहासी
॥३०॥जरीपतीनयेईसत्वरी ॥ तरीतूंआपलेशरीरीं ॥ मजलागींलीनकरीं ॥ येवढेंदेईं
शंकरा ॥३१॥ ऐसेंऐकतांस्त्रियेचेंवचन॥तिजसीबोलेभाललोचन ॥ तुझेंईप्सितहोईं
लपूर्ण ॥ संशयनधरींमानसीं ॥ ३२ ॥ इतुकेंहोतांवर्तमान ॥ ऋषीआलास्वगृहा
लागून ॥ गृहांतस्त्रीनदेखतांत्यान ॥ प्रश्नकेलाऋषींलागीं ॥ ३३ ॥ तोंनारायणमु
नीह्मणेऋषींशी ॥ नदेखतांगृहींस्त्रियेसी॥ उद्विग्नताआलीममामानसीं ॥ कायवर्तमा
नसांगामज ॥ ३४ ॥ ऋषीसांगतीनारायणमुनीसी ॥ सेतुनामेंराजापरियेसी ॥ ते
णेंपळविलेंतवस्त्रियेसी ॥ आह्मींराजासीविनविलें ॥ ३५ ॥ तोंनऐकेआमुच्यावच

नासी ॥ आह्मांधिःकारूनिपरियेसी ॥ नेताझालाबलेंस्त्रियेसी ॥ उपायकांहींचाले
ना ॥ ३६ ॥ ऐसेंऐकतांऋषीचेंवचन ॥ नारायणमुनीक्रोधायमान ॥ गमनकरिता
झालाराजयालागून ॥ शिवालयदेखिलें ॥ ३७ ॥ शिवालयींजोंअवलोकित ॥ तों
स्त्रीदेखिलीरक्षकीरक्षित ॥ तेधवांरायातेंबोलत ॥ चंदलादेईंमजलागीं ॥ ३८ ॥ रा
जाह्मणेनारायणऋषीसी ॥ फलमूलाहारतूंकरितोसी ॥ चंदलातवपत्नीजाहलीकैसी ॥
हेंमजसीनिवेदावें ॥ ३९ ॥ चंदलाअसेस्त्रीरत्न ॥ तीमजसीचयोग्यजाण ॥ तूंजाईं
स्वस्थानालागून ॥ यथासुखेंकालक्रमीं ॥ ४० ॥ ऐसेंऐकतांनृपवचन ॥ नारायण
मुनीखिन्नमन ॥ सिद्धपादुकेवरीबैसोन ॥ ज्वालामुखीप्रतीगेला ॥ ४१ ॥ मानसीं
करीतियेचेंध्यान ॥ ह्मणेदेवदेवेशीआनंदवर्धन ॥ मजलागींहोईंप्रसन्न ॥ किंकरअ
सेंमीतुझा ॥ ४२ ॥ ऐसेंऐकतांऋषीचेंवचन ॥ देवीजाहलीप्रसन्न ॥ ह्मणेमागेंवरदा
न ॥ इच्छावसेजीतवमानसीं ॥ ४३ ॥ ऐकतांदेवीचेंवचन ॥ नारायणमुनीबोले
तिजलागून ॥ माझीभार्यासेतुबंधराजान ॥ बलात्कारेंहरणकेली ॥ ४४ ॥ तीप्राप्त
होईलज्याउपायें ॥ तेंकरावेंदेवीमाये ॥ वचनऐकतांदेवीसये ॥ करुणासत्वरीऋषी
ची ॥ ४५ ॥ तयासीदिधलेचारभ्रमर ॥ बोलतीझालीतयासीसत्वरी ॥ हेकरितील
तुझेंकार्यसमग्र ॥ सत्वरजाईंस्वस्थाना ॥ ४६ ॥ देवीचीआज्ञाहोतांतयासी ॥ भ्र
मरघेऊनियांसंगेंसी ॥ प्राप्तजाहलासत्यसेतुनगरीसी ॥ राजद्वाराचेसन्निध ॥ ४७ ॥

रायेंनगरद्वारेंलावून ॥ सैन्ययुद्धासीसिद्धकरून ॥ आपुलेहस्तींशस्त्रघेवोन ॥ भयभी
तझालामानसीं ॥ ४८ ॥ ऋषीयोगबलेंकरोनीत्वरित ॥ राजासन्निधजाहलाप्राप्त ॥
चारीभ्रमरसोडोनिदेत ॥ राजयाचेअंगावरी ॥ ४९ ॥ भ्रमरजाहलेकोटयावधी ॥
राजयानसेकिंचितशुद्धी ॥ तात्काळसर्वांचीपूर्णअवधी ॥ प्रलयझालातेस्थानीं ॥५०॥
सैनिकजनांसहवर्तमान ॥ राजयालागींवधून ॥ पुनरपीभ्रमरचारहोवोन ॥ प्राप्त
जाहलेस्वस्थानीं ॥ ५१ ॥ हासैन्यप्रलयअवलोकून ॥ चंदलाह्मणेशिवालागून ॥
आतांमजदेईंस्वदेहींस्थान ॥ अद्यापीपतीनयेई ॥ ५२ ॥ ऐसेंऐकतांचंदलावचन ॥
शंकरेंआपुलामस्तकभेदून ॥ तीजोंवरीकरीमस्तकींगमन ॥ तोंपतीतेथेंपातला ॥ ५३॥
चंदलाअवलोकितांपतींसी ॥ आनंदयुक्तजाहलीमानसीं ॥ हर्षेंह्मणेनारायणमुनी
सी ॥ कायप्रकारजाहला ॥ ५४ ॥ नारायणमुनीह्मणेतिजसी ॥ ज्वालामुखीच्या
प्रसादेंसी ॥ वधूनियांससैन्यराजासी ॥ तुजपासींमींपातलों ॥ ५५ ॥ ऐसेंऐकतांप
तीचेंवचन ॥ चंदलाकरीदेवीचेंस्तवन ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदालागून ॥ देवीप्रसन्नजाह
लीतिजसी ॥ ५६ ॥ ह्मणेमागेंवरदान ॥ मीजाहलेंतुजसीप्रसन्न ॥ जेंजेंइच्छिलतु
झेंमन ॥ तेंपूर्णकरीनतात्काळ ॥ ५७ ॥ देवीचेंऐकोनियांवचन ॥ चंदलाबोलेतिज
लागून ॥ जरीजाहलीअससीप्रसन्न ॥ तरीप्राप्तहोईयेस्थानीं ॥ ५८ ॥ तुजसीअ
सावेंमाझेंनाम ॥ मजवरीअसोतुझेंप्रेम ॥ जेस्मरतीलतुजसीसकाम ॥ इच्छापूर्ण

॥ ३ ॥ होवोत्यांची ॥ ५९ ॥ देवीह्मणेचंदलेसी ॥ तवइच्छापूर्णहोईनिश्चयेंसी ॥ ऐसेंसांगो
निपाषाणरूपेंसी ॥ राहतीझालीतेस्थानीं ॥ ६० ॥ तेथेंअसेभवानीतीर्थ ॥ तयामा
जीजेस्नानकरित ॥ तयांउत्तमलोकप्राप्तहोत ॥ निश्चयेंसीजाणपां ॥ ६१ ॥ चंदला ॥३९॥
आणिनारायणमुनी ॥ येस्थानींसौख्यभोगूनी ॥ अंतींगेलेस्वर्गभुवनीं ॥ सूतह्मणे
शौनकादिकां ॥ ६२ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचदत्तकृपे
न ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ६३ ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरि
त्रे सूतकथितकथाकल्पतरौ भवानीतीर्थमहिमावर्णनंनाम एकोनचत्वारिंशाध्याय
गोडहा ॥ ३९ ॥ ॥ ओंव्यासंख्या ॥२३१७ ॥



॥ ३ ॥

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसांबसदाशिवायन
मः ॥ ॐनमोजीविश्वनाथा ॥ पतितपावनास्मरणकरितां ॥ असुरमर्दनादक्षजामा
ता ॥ विश्वेश्वराजगद्गुरु ॥ १ ॥ भस्मासुरमाजलाथोर ॥ क्षणांतकेलासीसंहार ॥
मनमोहनकर्पूरगौर ॥ उपासकांप्रसन्नहोशी ॥ २ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ पु
ढेंश्रवणकरारामतीर्थमहिमेसी ॥ विधीह्मणेनारदासी ॥ एकभावेंऐकपां ॥ ३ ॥
तेथेंकेलियाश्राद्धदान ॥ संपत्तीप्राप्तत्यालागुन ॥ जीनाशनपावेनिश्चयेंकरून ॥ अ
क्षयीराहेत्यापासीं ॥ ४ ॥ इक्ष्वाकुयानामेंकरून ॥ सूर्यवंशज्ञानवान ॥ त्यांतप्रता
पवंतअजनंदन ॥ दशरथनामेंप्रसिद्ध ॥ ५ ॥ दशरथप्रजापालनकरी ॥ आपुल्या
प्रियपुत्रापरी ॥ तयाचीनयेअन्यासरी ॥ जितेंद्रियसत्यवादी ॥ ६ ॥ कोशलनृपाची
कुमरी ॥ कौशल्यानामेंसुंदरी ॥ मागधकन्यासुमित्रादुसरी ॥ पर्णूनिआणिल्याप्री
तीनें ॥ ७ ॥ केकयदेशाचानृपती ॥ कैकयतयासीह्मणती ॥ त्याचीकन्याकेकसीस
ती ॥ तिसरीपत्नीदशरथाची ॥ ८ ॥ तीनहीभार्यैसींसहित ॥ राजाआनंदेंराज्यकरि
त ॥ परीपोटींनोहेसुत ॥ चिंताकरीअत्यंत ॥ ९ ॥ पुत्रनहोईह्मणोन ॥ पुत्रकामे
ष्टीऋषींकडून ॥ करविताजाहलाआनंदोन ॥ पुत्रव्हावयाकारणें ॥ १० ॥ तयायज्ञ
कुंडापासोन ॥ प्रगटजाहलाअग्निनारायण ॥ शंखचक्रगदापद्मींकरून ॥ शोभायमा
नदिसतसे ॥ ११ ॥ रायासीह्मणेकृशान ॥ मनेप्सितमागेंवरदान ॥ ऐसेंनृपेंवचन

ऐकोन ॥ राजाह्मणेतयासी ॥ १२ ॥ त्वांबालरूपधरून ॥ माझेउदरींघेईं
जनन ॥ ऐसेंऐकतांनृपवचन ॥ अग्नीह्मणेतथास्तु ॥ १३ ॥ मीतुझेउदरींजन्म
घेऊन ॥ दुष्टजनांचासंहारकरीन ॥ देवादिकांचेंकरीनमोचन ॥ वानरबलेंकरूनि
यां ॥ १४ ॥ ऐसेंसांगोनिरायासी ॥ क्षीरपात्रदिधलेंतयासी ॥ वसिष्ठेंतीनभागक
रूनितीनस्त्रियांसी ॥ देताझालाआनंदें ॥ १५ ॥ त्याक्षीरभक्षणेंकरून ॥ स्त्रियाक
रितीगर्भधारण ॥ तयांसीडोहळेपुसून ॥ पूर्णकरिताजाहला ॥ १६ ॥ वसंतींचैत्रशु
क्लपक्षीं ॥ कर्कटलग्नींनवमीसी ॥ माध्यान्हसमयहोतांत्वरितेंसी ॥ जन्मजाहलेंचौ
घांचें ॥ १७ ॥ रामजन्महोतांतात्काळ ॥ आनंदेंजनकरितीकल्लोळ ॥ दुंदुभीनादें
नभमंडळ ॥ दुमदुमिलेंतेधवां ॥ १८ ॥ स्वर्गींगंधर्वकरितीगायन ॥ नृत्यकरितीअ
प्सरोगण ॥ तयाचेंजातकर्मकरून ॥ रामनामठेविलें ॥ १९ ॥ पुढेंतेचौघेहीकुमर॥
दिवसेंदिवसवाढतीथोर ॥ तोंप्राप्तझालाविश्वामित्र ॥ रामायागरक्षणान्यावया ॥
॥ २० ॥ विश्वामित्रासहरामलक्ष्मण ॥ त्याच्याआश्रमींजावोन ॥ तयाचायज्ञसंर
क्षोन ॥ राक्षसांशिक्षालाविली ॥ २१ ॥ पुढेंजावोनीमिथिलानगरीं ॥ धनुष्यागुण
चढवोनीसत्वरी ॥ पर्णूनियांजनककुमरी ॥ प्राप्तजाहलेअयोध्ये ॥ २२ ॥ पुढेंरा ॥१॥
मासिराज्याभिषेक ॥ करावयादशरथउत्सुक ॥ ऐसेंऐकतांकैकयीदुःख ॥ करीत
सेअनिवार ॥ २३ ॥ रायासीह्मणेकैकयी ॥ रामासीवनापाठऊनिदेईं ॥ भरताला

गींराज्यपाहीं ॥ सत्वरीयावेंराजेंद्रा ॥ २४ ॥ ऐसेंसमजतांरामासी ॥ सीतेसहवर्तमानलक्ष्मणासी ॥ घेवोनिगेलाअरण्यासी ॥ त्रिकूटपर्वतींआनंदें ॥ २५ ॥ इकडे दशरथेंप्राणसोडिला ॥ भरतअत्यंतदुःखीतझाला ॥ रामासीयेवोनीभेटला ॥ आज्ञाजाहलीराज्यपालना ॥ २६ ॥ पुढेंरामगेलेभीमाशंकरीं ॥ तेथेंलिंगस्थापिलेंपुण्यकारी ॥ भजकांमुक्तिप्राप्तनिर्धारीं ॥ होतअसेसत्वरी ॥ २७ ॥ लिंगनामअसेरामेश्वर ॥ तेथेंरामतीर्थअसेथोर ॥ जेसेवाकरितीदृढनिर्धार ॥ विलोकतयांप्राप्त ॥२८॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ विधीनेंसांगीतलेंनारदासी ॥ तेंचिचरित्रम्यांतुह्मांसी ॥ यथामतीनिवेदिलें ॥ २९ ॥ रामाश्रयेंकरूनिजाण ॥ याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ३० ॥ इतिश्रीपद्मपुराणे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ रामतीर्थमहिमावर्णनंनामचत्वारिंशत्तमाध्याय गोडहा ॥ ४० ॥ ॥ ओंव्या संख्या ॥ २३४७ ॥ ॥ ॥



॥ इति श्रीभीमामाहात्म्ये
चत्वारिंशाध्यायः ॥


अध्याय ४१ वा.
त्रिविक्रम राजा.
ब्राह्मण.
त्रिविक्रम राजा.
जन.
स्त्री.
पापप्रणाशन तीर्थ

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीउमामहेश्वराभ्यांन
मः ॥ श्रीभीमाशंकरायनमः ॥ ॐनमोजीभालचंद्रा ॥ हिमनगजामातागंगाधरा ॥
वैकुंठमनरंजनात्रिपुरहरा ॥ त्रिदोषशमनात्रिपुरेशा ॥ १ ॥ मदनांतकामनमोहना ॥
मदमत्सरविपिनदहना ॥ हेमायापाशनिकृंतना ॥ गिरिजारमणातुजनमो ॥ २ ॥
सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ पापप्रणाशननामेंतीर्थासी ॥ ब्रह्मदेवसांगेनारदासी ॥ ए
कचित्तेंश्रवणकरीं ॥ ३ ॥ भीमाशंकरतीर्थांत ॥ पापप्रणाशनतीर्थविख्यात ॥ तयाचें
जेस्मरणकरित ॥ पापरहितहोतीते ॥ ४ ॥ जेथेंकेलियाहवनयज्ञ ॥ तैसेंचीजपध्या
नपूजन ॥ भक्तियुक्तकरितांतीर्थसेवन ॥ महत्संकटेंदूरहोती ॥ ५ ॥ सूतह्मणेशौन
कादिकांस ॥ प्रत्ययार्थऐकाइतिहास ॥ सत्यवेदनामकपुरास ॥ त्रिविक्रमराजाअ
सताझाला ॥ ६ ॥ त्याच्यापूर्वकर्मेंसहज ॥ रात्रींहोतसेकृमिपुंज ॥ तोचिदिव
सानृपराज ॥ कर्मगतीविचित्र ॥ ७ ॥ ह्यादुःखाचेंव्हावयानिरसन ॥ बहुतकरी
सुवर्णदान ॥ येकेदिवशींपुरोहितालागुन ॥ नृपास्त्रियाविचारिती ॥ ८ ॥ कोण
त्यापापेंकरून ॥ राजाकृमिपुंजहोतसेपूर्ण ॥ तेंसांगाजीआह्मांलागून ॥ विस्ता
रयुक्तसर्वही ॥ ९ ॥ विप्रसांगतसेस्त्रियांसी ॥ पूर्वींराजागेलामृगयेसी ॥ ते
थेंदेखिलेंवानरासी ॥ येकेंबाणेंवेधिलेंत्या ॥ १० ॥ तात्काळद्विजरूपधरून ॥ वा
नरभूमीवरीपावलापतन ॥ तयासीकरूनिअवलोकन ॥ राजाप्रश्नकरीतसे ॥ ११ ॥

तूंवानररूपकायकारणेंसी ॥ विप्राधारणकेलेंअससी ॥ विप्रह्मणेमणिदत्तनामेंसी
॥ पितरींमातेंशापिलें ॥ १२ ॥ शापद्यावयाचेंकारण ॥ राजेंद्रासांगतोंकरींश्र
वण ॥ मौनकेलेंयज्ञयागहवन ॥ श्राद्धतर्पणहीनकेलें ॥ १३ ॥ जेकोणीनकरि
तीधर्माचरण ॥ त्यांसीवानरत्वप्राप्तहोईलजाण ॥ केलियावांचूनधर्मदान ॥ संसार
व्यर्थअसेहा ॥ १४ ॥ ऐसेंऐकोनिनृपेंवचन ॥ आलास्वनगरालागुन ॥ सर्ववृत्तगे
लाविसरून ॥ तेणेंकर्मेंकुर्मीहोती ॥ १५ ॥ याचेंव्हावयानिरसन ॥ भीमाशंकरीं
जावोन ॥ सस्त्रीककरावेंस्नान ॥ दुःखमुक्तहोईल ॥ १६ ॥ ऐशाऐकतांविप्रवचना
सी ॥ स्त्रियासांगतीराजासी ॥ चलावेंभीमाशंकरासी ॥ स्नानकरितांदुःखनिरसेल ॥
॥ १७ ॥ तेथेंजावोनिकरितांस्नान ॥ राजाचेंदुःखजाहलेंनिरसन ॥ पुढेंस्त्रियांसहि
तसौख्यभोगून ॥ अंतींगेलाशिवलोका ॥ १८ ॥ तेथेंतीर्थेंअसतीअसंख्यात ॥ ती
र्थलिंगेंअसतीशत ॥ तेथेंचिअसेपुण्यवर्धनतीर्थ ॥ पितृतर्पणेंमुक्तहोती ॥ १९ ॥
पूर्वींयौवनाश्वनामेंब्राह्मण ॥ त्याचीवर्णीनामेंस्त्रीजाण ॥ सस्त्रीकतोगौतमीलागुन ॥
जाताझालाक्षणार्धें ॥ २० ॥ गौतमीतीरींस्वप्नहोई ॥ स्वप्नींआपुल्यापितरांपाहीं ॥
तेरुदनकरितीआक्रोशेंही ॥ वृत्तकथितीपुत्रातें ॥ २१ ॥ आह्मांसीनहोयमोक्षप्राप्ती ॥ ॥१॥
नरकींयातनाबहुतहोती ॥ विप्रह्मणेमीप्रयागादितीर्थीं ॥ स्नानदानेंकेलींअसती ॥
॥ २२ ॥ पितरतेधवांसांगतीत्यासी ॥ नलगेबाळकाकाशीवाराणसी ॥ एकदांस्नान

करितांभीमाशंकरासी ॥ अमितपुण्यप्राप्तहोई ॥ २३ ॥ ऐसेंऐकतांपितृवचन ॥ भी
माशंकरींकेलेंगमन ॥ तेथेंभक्तीनेंकरितांस्नान ॥ पितरआशीर्वाददेती ॥ २४ ॥ बा
लकाअसोतुजसीकल्याण ॥ आह्मींजातसोंस्वर्गालागुन ॥ जेयेथेंकरितीस्नानदान ॥
मोक्षप्राप्ततयांसी ॥ २५ ॥ ब्रह्मदेवह्मणेनारदालागुन ॥ असंख्यतीर्थेंअसतीतेथेंजा
ण ॥ तेथेंएकतीर्थऋणमोचन ॥ स्नानदानेंपुण्यप्राप्ती ॥ २६ ॥ विश्वव्रतात्म्याचापुत्र ॥
प्रियव्रतनामेंकुमर ॥ नकरीविवेकेंसंसार ॥ पुत्रदाररहितअसे ॥ २७ ॥ पितरसां
गतीतयासी ॥ तूंकरींबालकाविवाहासी ॥ मुक्तीहोईलपितृऋणासी ॥ नातरीऋणी
राहसील ॥ ऐसेंऐकतांपितृवचन ॥ पुत्रनदेईतयामान ॥ ह्मणोनीकनिष्ठबोलेवचन ॥
परिवेत्तृत्वभयेंविवाहनकरीं ॥२९॥ ऐसेंऐकतांपुत्रवचन ॥ पितरसांगतीतयालागुन ॥
भीमाशंकरींकरावेंस्नान ॥ परिवेत्तृत्वहरेल ॥ ३० ॥ तेथेंतयांनींकेलेंस्नान ॥ परिवे
तृदोषगेलानिरसोन ॥ कनिष्ठपुत्रेंविवाहकरून ॥ संसारचालविलायथाविधी ॥३१ ॥
पितृऋणापासूनिजाहलेऋणमुक्त ॥ अंतींगेलेस्वर्गाप्रत ॥ तेथेंजेस्नानदानकरित ॥
स्वर्गलोकप्राप्ततयां ॥ ३२ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ ब्रह्मदेवेंसांगीतलेंनारदा
सी ॥ तीचकथाम्यांतुह्मांसी ॥ यथामतीनिवेदिली ॥ ३३॥ रामाश्रयेंकरूनीजाण ॥
याग्रंथाचेंलेखन ॥ तैसेंचदत्तकृपेन ॥ केलेंअसेमान्यअसो ॥ ३४ ॥ इतिश्रीपद्मपुरा

---

१ ज्येष्ठबंधूच्या विवाहा पूर्वीं कनिष्ट बधूनें विवाह केल्यास परि वेत्ता ह्मणतात.

णे उत्तरसंहितांतर्गतभीमाचरित्रे सूतकथितकथाकल्पतरौ पापप्रणाशनतीर्थे पुण्यवर्धनतीर्थे ऋणमोचनतीर्थमहिमावर्णनंनामएकचत्वारिंशत्तमाध्यायगोडहा ॥ ४१ ॥

॥ छ ॥ ॥ छ ॥ ओंव्या संख्या ॥ २३८१ ॥ छ ॥ ॥ छ ॥





श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीमातापितृभ्यांनमः ॥
श्रीभीमाशंकरायनमः ॥ श्रीजगत्सृष्टिस्थितिलयांतकरायनमः ॥ ॐनमोजीजग
त्पालका ॥ संतजनविघ्ननाशका ॥ साधुजनांचियापालका ॥ मायातीताजगद्गुरो ॥
॥ १ ॥ सनकादिवंद्याआनंदविलासा ॥ पार्वतीपतेदुरितनाशा ॥ सर्वाद्यपुरुषामहे
शा ॥ विश्ववंद्यारामहृदयस्था ॥ २ ॥ जगन्नाटकसूत्रधारिया ॥ तवाधीनअसेमहा
माया ॥ संसारींकष्टकरितीवायां ॥ प्राणिमात्रमोहानें ॥ ३ ॥ गुणातीतापुराणपुरुषा ॥
अविद्याविपिनविध्वंसा ॥ गौरीरमणाऊर्ध्वाक्षा ॥ आनंदवर्धनाजगत्पूज्या ॥ ४ ॥
आनंदवनामाझारी ॥ समाधीलाविसीखेचरी ॥ तुझेंध्यानजोदृढकरी ॥ तयासीदुः
खेंनबाधती ॥ ५ ॥ सर्वाहूनतूंअससीनिराळा ॥ सौख्यदेसीभक्तमंडळा ॥ तुजसा
रिखाभक्तभोळा ॥ देवनसेदूसरा ॥ ६ ॥ शौनकादिकसर्वऋषि ॥ कथामृतपानेंत
ल्लीनमानसीं ॥ सांगतीआनंदेंसूतासी ॥ अनंततीर्थेंश्रवणकेलीं ॥ ७ ॥ तुझ्याअलौ
लिकवक्तृत्वेंकरून ॥ आनंदसागरींपोहेमन ॥ पुढेंकथामृतकरवींप्राशन ॥ तरीआमु
चेंसफलजन्म ॥ ८ ॥ सूतह्मणेशौनकादिकांतें ॥ पुढेंकृष्णाचरित्रकराश्रवणातें ॥
जेंपठणमात्रेंमोक्षदेतें ॥ ब्रह्मदेवसांगेनारदातें ॥ ९ ॥ कृष्णासंगमाचेंआख्यान ॥ ऋ
षिहोएकचित्तेंकराश्रवण ॥ कान्हुरनामकराजान ॥ क्षेत्रस्थापिलेंअसेची ॥ १० ॥
जेथेंअसेदेवसोमेश्वर ॥ स्मरणमात्रेंमुक्तिदेणार ॥ तेथेंदेवदानवसमर ॥ भयंकरहो

तेंझालें ॥ ११ ॥ देवअथवादैत्यगण ॥ परस्परजयेच्छावसेजाण ॥ कैलासपर्वतींजा
वोन ॥ विनवितातोशंकरा ॥ १२ ॥ जलंधरासीहोतसेयुद्ध ॥ शस्त्रांहींआह्मींजाह
लोंविद्ध ॥ आमुचापोटींघालोनिअपराध ॥ मुक्तकरींआह्मांतें ॥ १३ ॥ ऐसेंऐकतां
देववचन ॥ विष्णूसिबोलावीपार्वतीरमण ॥ तयाआज्ञापीतत्क्षण ॥ युद्धालागींजावें
तत्रां ॥ १४ ॥ नारायणेंजावोनितेथ ॥ युद्धकेलेंअसेअद्भुत ॥ तथापीदैत्यपराभवन
होत ॥ विष्णूविचारीमानसीं ॥ १५ ॥ जलंधरपत्नीवृंदासती ॥ महापतिव्रताअसे
ती ॥ त्याकारणेंदैत्यांप्रती ॥ अपजयप्राप्तनहोई ॥ १६ ॥ ऐसेंविचारूनिमानसीं ॥
निघालावृंदेच्यागृहासी ॥ कापट्यरूपधरूनिप्रेमेंसी ॥ पातिव्रत्यनष्टकेलें ॥ १७ ॥
वृंदेनेंकापट्यजाणोन ॥ अग्निप्रवेशकेलातत्क्षण ॥ त्याभस्मामाजीनारायण ॥ रात्रं
दिवसवासकरी ॥ १८ ॥ हेंलक्ष्मुमीसीकळलेंवर्तमान ॥ कींवृंदाविभूतींतराहेनारायण ॥
तात्काळतेथेंप्राप्तहोऊन ॥ विचारीतसेकृष्णातें ॥ १९ ॥ मजसीकंटाळलेतकांतुह्मी ॥
कायकेलाअसेअन्यायमीं ॥ इतुकीप्रीतीवृंदाभस्मीं ॥ तरीशापघ्यावामाझा ॥ २० ॥
नदीचेंरूपघेवोन ॥ भूमीवरीकरावेंसंचरण ॥ ऐसालक्ष्मुमीनेंशापदेवोन ॥ गमनके
लेंस्वस्थानीं ॥ २१ ॥ तीकृष्णानदीजाहली ॥ भीमेचियेसन्निधआली ॥ तियेसीप्रे
मेंभेटली ॥ संगमजाहलातेस्थानीं ॥ २२ ॥ तेथेंजेकरितीस्नानदान ॥ तैसेंचीश्रा
द्धतर्पण ॥ करितीलजेप्रेमेंकरून ॥ तयांसीमुक्तीप्राप्तहोई ॥ २३ ॥ ब्रह्मदेवह्मणेना

रदासी ॥ दोनकाकझुंजतीपरस्परआकाशीं ॥ दैवयोगेंभीमाकृष्णासंगमासी ॥ पत
नपावतेजाहले ॥ २४ ॥ खालींपडतांचिघडलेंस्नान ॥ तयांचेंरूपगेलेंपालटोन ॥
तात्काळहंसरूपहोवोन ॥ जातेझालेतेथूनी ॥ २५ ॥ भीमाकृष्णासंगमापासोन ॥
भीमागुप्तजाहलीजाण ॥ पुनःपूर्वसमुद्राचेसन्निधान ॥ उत्पन्नजाहलीपरियेसा ॥२६॥
तीएकामुखेंकरून ॥ सागरासीएकत्वपावलीजाण ॥ कृष्णाचाद्विमुखह्मणतीजन ॥
अज्ञानत्वेंकरूनियां ॥२७॥ भीमदेहापासोनिजाहली ॥ भीमरथराजानेंस्थापिली ॥
सेवकजनांमुक्तीतात्काळीं ॥ प्राप्तहोतसेनिश्चयें ॥ २८ ॥ पूर्वसागरजोपुण्यपावन ॥
तेथेंभीमेसीजाहलेंमेलन ॥ तेथेंजेकरितीश्राद्धदान ॥ मुक्तीप्राप्तहोयत्यांतें ॥ २९ ॥
सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ येथवरीकथिलेंतीर्थमहिम्यासी ॥ जेकरितीश्रवणपठ
णासी ॥ तयांचेहेतूपूर्णहोती ॥ ३० ॥ ओंवीअथवाअर्धओंवी ॥ नियमानेंपठणक
रावी ॥ अथवाश्रवणकरितांबरवी ॥ सर्वसौख्यप्राप्तहोई ॥ ३१ ॥ भक्तीनेंअथवा
संगेंकरून ॥ जेकरितीलश्रवणवापठण ॥ तेबेचाळिसांसहवर्तमान ॥ शिवलोकीं
अक्षयीनांदती ॥ ३२ ॥ शौनकादिकह्मणतीसूताकारण ॥ हढरहावयास्मरण ॥ सं
कलितवृत्तआह्मांकारण ॥ निवेदावेंसर्वज्ञा ॥ ३३ ॥ सूतह्मणेतेधवांऋषींसी ॥ ए
काग्रकरोनियांचित्तासी ॥ श्रवणकराहोएकभावेंसी ॥ सांगतोंमीप्रीतीनें ॥ ३४ ॥
प्रथमाध्यायाचेआरंभालागोन ॥ गणपतीसीकरोनीनमन ॥ सरस्वतीतेंअभिवंदून ॥

शिवस्तवनआरंभिलें ॥ ३५ ॥ व्यासवसिष्ठादिमहामती ॥ तयांलागींकरूनीनती
मंगलाचरणकरूनीप्रीतीं ॥ प्रथमाध्यायपूर्णकेला ॥३६॥ देवदानवांजाहलासमर॥
दैत्यपराजयपावलेअपार ॥ दितीतपकरीतसेथोर ॥ ब्रह्मवरेंपुत्रझाले ॥ ३७ ॥ त्रि
पुरऐसेंनामाभिधान ॥ त्यातिघांसीहोतेंजाण ॥ शंकरेंवधिलेंतयांकारण ॥ द्वितीय
तृतीयाध्यायींकथनहें ॥ ३८ ॥ भीमरथरायेंतपकरून ॥ शंकरालागींस्तवून ॥ म
हाबलेश्वरींभीमास्थापिलीआणून ॥ चतुर्थाध्यायींपरियेसा ॥ ३९ ॥ पंचमाध्यायीं
भीमामाहात्म्यकथन ॥ षष्ठाध्यायींपिशाचमोक्षण ॥ सप्तमाध्यायींडाकिनीक्षेत्रवर्ण
न ॥ जैमिनस्यऋषीउद्धरला ॥ ४० ॥ अष्टमाध्यायींविश्वावसूउद्धरण ॥ नवमांतहे
मसंचकदुःखमोचन॥दशमांतसुमर्शनदुःखनिरसन ॥ ज्ञानवापीमाहात्म्यकथिलें ॥
॥ ४१ ॥ शंकरतीर्थाचेंवर्णन ॥ मुक्तजाहलाधनशर्माब्राह्मण ॥ एकादशांतहेंअसेक
थन ॥ द्वादशींहामराजाशुद्धझाला ॥ ४२ ॥ त्रयोदशअध्यायाचेठाईं ॥ अमृतसंजी
वनीतीर्थेंपाहीं ॥ प्रेतउठलेंपाहिलेंसर्वांहीं ॥ आनंदजाहलासर्वांसी ॥ ४३ ॥ चतु
र्दशांतभैरवतीर्थेंब्रह्महत्यानिरसन ॥ पंचदशांतत्रिशूलतीर्थमहिमावर्णन ॥ लुब्धक
गेलाउद्धरून ॥ शिवस्थानींपरियेसा ४४ ॥ डमरुतीर्थाचेप्रभावान ॥ ब्रह्महत्याजाह
लीनिरसन ॥ अपत्यप्राप्तीअंबरीषाकारण ॥ षोडशाध्यायींचरित्रहें ॥ ४५ ॥ विभू
तितीर्थमहिमाकथन ॥ भवविप्रउद्धरलासप्तदशींजाण ॥ अष्टदशांतचंद्रतीर्थमहिमा

वर्णन ॥ अनसूयराजाउद्धरला ॥ ४६ ॥ शिवपार्वतीविवाहवर्णन ॥ दक्षप्रजापतीयज्ञ
मथन ॥ भ्रमिक्षेत्राचेंकारण ॥ एकोनविसाव्यांतकथियेलें ॥ ४७ ॥ विसाव्यामाजीव
र्णन ॥ ब्रह्मराक्षसगेलाउद्धरोन ॥ भ्रमणहरतीर्थकथन ॥ यमदूतींराजासीधर्मकथिले
॥४८॥ एकविसावेअध्यायांत ॥ वायुतीर्थोत्पत्तिसहित॥भीमाअरुणासंगमचरित ॥ सां
गीतलें॥४९॥सिद्धतीर्थाचेंवर्णन ॥ बाविसाव्यांतजाहलेंपूर्ण ॥ पिप्पलग्रामतीर्थकथन
॥तेविसाव्यांतजाहलें॥५०॥चोविसाव्यांतबहुलातीर्थचरित॥ राजाजाहलाशापमुक्त ॥
इंद्राणीभीमासंगमयथार्थ ॥ पंचविसाव्यांतवर्णिला ॥ ५१ ॥ मूलामुठेचीउत्पत्ती ॥
कथिलीअसेषड्विंशतीं ॥ सत्ताविसाव्यांतवडवोत्पत्ती ॥ बहुतसुरसकथियेली ॥५२॥
शुभकारकरामजनन ॥ पितृवचनेंअरण्यगमन ॥ रावणेंजानकीचेंकेलेंहरण ॥ सा
गरींसेतुबांधिला ॥ ५३ ॥ रावणासीससैन्यमारून ॥ सीताआणिलीमुक्तकरून ॥
भीमाशंकरींनातालतीर्थस्थापन ॥ अठ्ठाविसाव्यांतकथियेलें ॥ ५४ ॥ शिवतीर्थसर
स्वतीतीर्थ ॥ संगमजाहलापुण्यवंत ॥ एकोनतिसाव्यांतहेंचरित ॥ यथासांगजा
हलें ॥ ५५ ॥ सिद्धिविनायकतीर्थब्रह्मतीर्थ ॥ वर्णनअसेतिसाव्यांत ॥ विष्णुतीर्थ
कात्यायनतीर्थ ॥ एकतिसाव्यांतकथियेलें ॥ ५६ ॥ पलाशदेवतीर्थवर्णन ॥ बत्तिसा
व्यांतजाहलेंपूर्ण ॥ कूर्मभैरवकोटीश्वरहनुमान ॥ तीर्थेंतेहतिसाव्यांतकथियेलीं ॥
॥ ५७ ॥ भीमानीरासंगमनृसिंहतीर्थवर्णन॥ चवतिसाव्यांतजाहलेंजाण ॥ पस्ति

साव्यांतसंपूर्ण ॥ पंढरीमाहात्म्यवर्णिलें ॥५८॥ मातृतीर्थधूलिखेटतीर्थ ॥ वर्णिये
लेंछत्तिसाव्यांत ॥ ब्रह्मश्वेतप्रगाथशंखतीर्थ ॥ चक्रादितीर्थेंसदतिसाव्यांत ॥ ५९ ॥
कागिनीपरमेश्वरीतीर्थवर्णन ॥ अडतिसाव्यांतजाहलेंजाण॥भवानीतीर्थाचेंवर्णन ॥
एकोनचाळिसाव्यांतजाहलें ॥ ६० ॥ रामतीर्थमहिमावर्णन ॥ चाळिसाव्यांतजाह
लेंपूर्ण ॥ पापप्रणाशनपुण्यवर्धन ॥ ऋणमोचनतीर्थेंएकेचाळिसाव्यांत ॥ ६१ ॥ कृ
ष्णासंगमपूर्वसमुद्राशी ॥ कथियेलाम्यांतुह्मांशी ॥ तैसेंचिसंकलितसर्वचरित्राशीं ॥
बेचाळिसाव्यांतकथियेलें ॥ ६२ ॥ सूतह्मणेशौनकादिकांसी ॥ भीमामाहात्म्यक
थिलेंतुह्मासी ॥ जेकरितीलश्रवणपठणासी ॥ मुक्तहोतीतात्काळ ॥६३॥ ब्रह्मदेवसां
गेनारदातें ॥ भीमाचरितकथिलेंतूतें ॥ जेकरितीलश्रवणपठणातें ॥ जीवन्मुक्ततेचि
जाणा ॥ ६४ ॥ मोहमयीनामकनगरीं ॥ कालिकादेवीचेमार्गावरी ॥ रघुकुल
भूषणराममंदिरीं ॥ ग्रंथलेखनपूर्णजाहलें ॥ ६५ ॥ रघुकुलींश्रेष्ठजाण ॥ कौसल्ये
चेंहृदयरत्न ॥ श्रीरामाचेकृपालेशेंकरून ॥ ग्रंथलेखनपूर्णझालें ॥ ६६ ॥ त्रिमूर्ती
चेंरूपयेक ॥ अनसूयेचेंपूर्णसुख ॥ दत्तात्रेयाचेकृपेंदेख ॥ ग्रंथलेखनपूर्णझालें॥६७॥
दत्तकिंकरविनवीश्रोतयांचतुरां॥भीमामाहात्म्यश्रवणकरा ॥ हंसक्षीरन्यायमानसीं
धरा ॥ प्रमादअनंतजाहलेअसती॥ ६८ ॥ इतिश्रीपद्मपुराणेउत्तरकांडेउत्तरसंहितां
तर्गतभीमामाहात्म्येपूर्वसागरकृष्णासंगमवर्णनंनामद्विचत्वारिंशत्तमाध्यायगोडहा४२

॥ ओंव्या संख्या ॥ २४४९ ॥

॥ श्रीभूतगणसेवितपार्वतीयुक्तसांबसदाशिवार्पणमस्तु ॥

॥ इतिश्रीभीमामाहात्म्यंसंपूर्णम् ॥


हा ग्रंथ

महादेव भवानी गवळी दरगे.

ठिकाणा—मुंबई चिऱ्याचा बाजार कोळंबट लाईन वाका मोहल्या समोर घरनंबर ५२.

यांनीं

शास्त्री यांजकडून शुद्ध करवून

मुंबई मध्यें

जगदीश्वर छापखान्यांत छापविला.

शके १८०८ आश्वीनवद्य १ सन १८८६

हाग्रंथ सन १८६७च्या २५ व्या आक्टाप्रमाणें रजिष्टर केला.

